# प्रेषित मुहम्मद (स.)
# यांची चाळीस आदर्श वचनं

लेखक
सैय्यद हामिद अली

भाषांतर
बादशहा शेख बार्शीकर

# अनुक्रमणिका

*''अल्लाह, असीम, दयावंत व कृपावंतच्या नावाने''*

## प्रास्ताविक

विश्वनायक अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी एकेश्वरवादाचा पुरस्कार केला. अनेक ईश्वर, देवता या कल्पनेस विरोध केला. परमेश्वर एकमेवाद्वितीय असून फक्त त्याचीच उपासना करावी हा विचार 'अरबा' मध्ये रुजविला. तोच विचार त्यांच्या काळात व त्यांच्यानंतर जगभर प्रभावीपणे पसरला. प्रेषित मुहम्मद (स.) यांना अल्लाहने वेळोवेळी 'दिव्यप्रकटणा' द्वारे, आकाशवाणीद्वारे मार्गदर्शन केले. ते सर्व कुरआनत संग्रहित आहे.

ईश्वराची कृपा असलेले आदरणीय प्रेषित मुहम्मद (स.) हे ईश्वराने दिलेल्या ज्ञानाच्या अनुषंगाने समाज स्वास्थासाठी नैतिक मार्गदर्शनही करीत. त्यांनी वेळोवेळी केलेले मार्गदर्शन जरी कुरआनप्रणीत असले तरी, देश, काल परिस्थिती पाहून ते केले आहे. हे मार्गदर्शनही कुरआन नंतर तितकेच मूल्यवान आहे. प्रेषितांच्या हयातीत या मार्गदर्शनाचा संग्रह होऊ शकला नाही. मात्र त्यांच्या पश्चात, त्यांच्या अनुयायांनी ते संग्रहित करण्यासाठी अतोनात परिश्रम केले. प्रेषितांच्या जवळ असणारे साहबी, (सहकारी) नातेवाईक यांच्याकडून त्यांची वचने संग्रहित केली. ती गोळा करताना त्यांची वचने सत्याच्या कसोटीवर तावून, सुलाखून व पारखून घेतली.

ही प्रेषित मुहम्मद (स.) यांची वचने संग्रहित केलेल्या बुखारी, तिर्मिज़ी, इब्नेमाजा, अहमद व दाऊद नामक संहिता आहेत. त्यामधून ही नैतिक वचने वेचून आपणासमोर सादर केली आहेत.

या वचनांवरून सामाजिक नैतिकता इस्लामला अभिप्रेत आहे, हे वाचकांच्या लक्षात येईल. तसेच प्रेषित मुहम्मद (स.) हे समाजजीवन सुधारक धार्मिक नेते होते. हे लक्षात यावे, यासाठीच 'हदिस'च्या महासागरातून ही वेचक रत्ने वाचकांसमोर ठेवली आहेत. त्याचा श्रध्दावंत स्वत:च्या उध्दारासाठी उपयोग करतील अशी आशा आहे.

## १) धर्माचे मूळ स्त्रोत आणि त्यांचे ज्ञान

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जगातील श्रेष्ठ ग्रंथांपैकी सर्वश्रेष्ठ ग्रंथ आदेशाच्या रूपाने प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर अवतरला. तो ग्रंथ म्हणजे इस्लामचा पवित्र कुरआन होय. पवित्र कुरआन व अल्लाहचे शेवटचे प्रेषित मुहम्मद (स.) ही अल्लाहने मानवास दिलेली सर्वोच्च देणगी आहे.

"इस्लाममध्ये अल्लाहच्या सर्वश्रेष्ठ नियमांमध्ये ढवळाढवळ करणे, त्यात बदल करणे, वाढीव मजकूर घालणे वा कमी करणे, हे सर्वांत वाईट व त्याज्य काम आहे.

"इस्लाममध्ये कुरआनात पूर्वीपेक्षा अन्य काही बदल करणे हा सर्वात मोठा गुन्हा आहे."

- मुस्लिम

ही 'हदीस' धर्माच्या तत्त्वज्ञानाचा मूलभूत स्त्रोत काय आहे हे विषय करते. कुरआन हे अल्लाहचे शब्द आहेत. म्हणून ते सर्वश्रेष्ठ आहेत. ते मानवास मिळालेले वरदान आहे. तसेच ते मार्गदर्शनही आहे. कुरआन हे अनंत काळापर्यंत अबाधित राहणार आहे. हे मार्गदर्शन अल्लाहकडून (ईश्वराकडून) केलेले आहे.

कुरआनच्या शिकवणीप्रमाणे व मार्गदर्शनाप्रमाणे, जर मानवाने वर्तन केले, तर मानवाची दु:खापासून सुटका होऊन, तो या जगात यशस्वी होईल. तसेच शेवटच्या दिवशी म्हणजे न्यायदानाच्या दिवशी त्याला जन्नत (स्वर्ग) प्राप्ती होईल. तो अल्लाहचा प्रिय बंदा (दास) होईल. त्याला अल्लाहची प्रसन्नता प्राप्त होईल.

अल्लाहच्या कृपेसाठी मानवाने इस्लाम समजून घ्यावा. दुर्वतनापासून दूर राहण्यासाठी कुरआनचे श्रद्धेने पठण करावे. त्याच्या ठायी नितांत आदरभाव दाखविला पाहिजे. कुरआनतील आदेशाप्रमाणे सत्‌शिल वर्तन करून कुरआनच्या विचाराचा प्रचार व प्रसार केला पाहिजे.

दुसऱ्या एका 'हदीस' मध्ये अल्लाहचे प्रिय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले.

"तुमच्या पैकी थोर मानव तोच आहे जो स्वत: कुरआन शिकून दुसऱ्यास शिकवतो."

- बुखारी, मुस्लिम

इस्लामचा दुसरा मुलभूत स्त्रोत अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांचे आदर्श चरित्र, त्याच्या आदर्श वर्तनाप्रमाणे प्रत्येक मुस्लिमांनी वर्तन ठेवावे अशी आज्ञा आहे. त्यांचे चरित्र हे कुरआनचे व्यावहारिक स्वरुप आहे. त्याच्या वर्तनातून कुरआनचा अर्थही स्पष्ट होतो.

'प्रेषित मुहम्मद (स.) यांचे चरित्र हा कुरआनचा आरसाच होय.'

इस्लामची श्रद्धा, प्रार्थना, ईश्वराचे हक्क आणि मानवांचे हक्क, यांचा समग्र तपशील व सर्वांग परिपूर्ण माहिती तसेच इस्लामच्या सर्व आदेशांचा खुलासा समजून, त्याप्रमाणे आचरण करण्यासाठी धर्मावर संपूर्ण श्रध्दा ठेवण्यासाठी व प. कुरआनचे आदेश समजून घेण्यासाठी अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांचे आचार, विचार व त्यांच्या सूचनांना आपल्या वर्तनात आणले पाहिजे.

कुरआन बरहुकूम वर्तन करणे व प्रसंगी कुरआनात मार्गदर्शन न मिळाल्यास प्रेषितांच्या विचाराप्रमाणे व आचाराप्रमाणे आपले वर्तन ठेवणे, या दोन गोष्टीच इस्लामच्या तत्त्वज्ञानाचे मूलभूत स्त्रोत आहेत.

त्यासाठी प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"मी तुमच्यासाठी माझ्यामागे दोन वस्तू सोडून जात आहे. जर तुम्ही त्यावर श्रध्दापूर्वक अंमल केला तर तुम्ही कधीही मार्गभ्रष्ट होणार नाहीत.

त्या दोन वस्तू म्हणजे अल्लाहचे कुरआन व त्याचे प्रेषित यांचे पवित्र व आदर्श वर्तन."

- मुअत्ता मलिक

जे काही पवित्र कुरआनात व प्रेषितांच्या जीवनचरित्रात आहे, तोच इस्लाम आहे. आणि त्यात जे नाही, ते धर्माच्या नावाखाली इस्लाममध्ये घुसडले आहे, ती अत्यंत वाईट गोष्ट आहे. असे प्रेषित म्हणतात.

जे काही कुरआन व प्रेषितांच्या जीवनचरित्रात नाही, ते इस्लाममध्ये घुसडले असेल त्यास 'बिदअत' म्हणतात. मग अशा गोष्टी, श्रध्देशी प्रार्थनेशी, प्रत्यक्ष वर्तनाशी व रीतिरिवाजांशी संबंधित असतील तरी त्या धर्मबहिष्कृत व त्याज्य समजाव्यात.

एके ठिकाणी खालीलप्रमाणे साक्ष (रिवायत) आहे,

"प्रत्येक धर्मबाह्य वर्तन म्हणजे बिदअत हा नरकाचा मार्ग आहे."

- अबु दाऊद, तिर्मिजी, इब्नेमाजा

एका अन्य साक्षी (हदिस) मध्ये प्रेषितांनी सांगितले,

"आमच्या धर्मामध्ये मुळात नसलेली (प्रक्षिप्त) नवी गोष्ट घातली तर ती स्वीकारली जाणार नाही."

- बुखारी, मुस्लिम

आजचा मुस्लिम ईश्वरी ग्रंथ कुरआन व प्रेषित मुहम्मद (स.) यांचे आदर्श वर्तन या बाबतीत निष्काळजी आहे. त्याचे धर्मबाह्य गोष्टींकडे लक्ष नाही, याचेच दुःख वाटते.

## २) इस्लामचा पाया

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"इस्लामचे पाच पायाभूत स्तंभ आहेत. १) साक्षीपूर्वक मान्य करणे की, अल्लाहशिवाय कोणीही पूजनीय, उपासनेस पात्र नाही. आणि प्रेषित मुहम्मद (स.) हे अल्लाहचे प्रेषित व आज्ञांकित आहेत. २) नित्य नियमित ५ वेळा नमाज पढणे. ३) जकात देणे ४) रमजान महिन्यात रोजे ठेवणे. ५) हजची (मक्केतील काबागृहाची) यात्रा करणे."

- बुखारी, मुस्लिम

वरील 'हदिस'मध्ये इस्लामची पायाभूत तत्त्वे सांगितली आहेत. या पाच स्तंभांवर इस्लामचा सर्व डोलारा उभा आहे. या मूलभूत आधारस्तंभा शिवाय इस्लामचे अस्तित्व शून्य होईल. हे आधारस्तंभ कोसळले तर धर्माची इमारतही कोसळेल.

ज्याला ज्याला आदर्श मुस्लिम बनावयाचे असेल धार्मिक म्हणवून घ्यावयाचे असेल, त्याने या पाच स्तंभावर श्रद्धा ठेवून, त्यांचा अंत:करणपूर्वक आचार व प्रचार करणे आवश्यक आहे. यासच अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी इस्लाम म्हटले आहे.

### १) 'श्रद्धा'

'तौहिद' हा इस्लामचा सर्वात मूलभूत तत्त्व आहे. त्यावरच इस्लामचे तत्त्वज्ञान आधारलेले आहे. 'तौहिद' म्हणजे ईश्वर 'एकच एक' आहे. एकाच ईश्वराची भक्ती इस्लामला अभिप्रेत आहे. ईश्वराच्या भक्तीमध्ये इतर कोणासही सामील करून घेता येणार नाही. ईश्वर एकच आहे, हे सच्च्या मुस्लिमांने अंत:करणपूर्वक मान्य केले पाहिजे. अल्लाहच एकमेव प्रार्थनीय आहे. मी त्या एकमेवाद्वितीय ईश्वराचीच आराधना करेन. त्याच्याशिवाय मी इतर देवदेवतांची बंदगी सजदा (चरणस्पर्श) करणार नाही.

त्याचबरोबर अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) हे शेवटचे प्रेषित आहेत, यावर माझा पूर्ण विश्वास आहे. त्यांच्या आज्ञेबरहुकूम माझे आमरण वर्तन ठेवीन. अल्लाहच माझा मालक, अधिकारी व एकमेव ईश्वर आहे, असा मी विश्वास ठेवीन. ईश्वराशिवाय अन्य कोणत्याही शक्तीवर विश्वास ठेवणार नाही. तसेच इतर देवदेवतांना पूज्य मानणार नाही. मी फक्त अल्लाह आणि अल्लाहचीच पूजा करेन. त्याचाच एकनिष्ठ पाईक होऊन राहीन. मी असे जाहीर करेन की, माझा मार्गदर्शक नेताही एकच असून, ते प्रेषित मुहम्मद (स.) हे आहेत. अल्लाह व इस्लाम वरील विश्वासासाठी व मार्गदर्शनासाठी मी फक्त त्यांचेच मार्गदर्शन मान्य करीन. इतर कोणाचेही मार्गदर्शन घेणार नाही.

वरीलप्रमाणे निर्णय मनोमन मान्य केल्यास मानवाचे ध्येय आणि मार्ग निश्चित होईल. त्यानंतर स्वत:च्या इच्छा, प्रचलित रीतिरिवाज, पूर्वपरंपरा व स्वत: मनाने तयार केलेले नियम, वगैरेचा पाठपुरावा करण्याऐवजी, ईश्वराचा बंदा, गुलाम, प्रेषितांचा आज्ञांकित आणि इस्लामचा सच्चा अनुयायी होतील.

## २) नमाज

दिवसातून ५ वेळेस नमाज अदा करणे हे आमचा अल्लाहशी सरळ संबंध जोडते. नमाज अल्लाहशी आमची कृतज्ञता व्यक्त करते. मी ईश्वराचा बंदा-गुलाम असल्याचे स्मरण ५ वेळेच्या नमाजने स्मरण होते. नमाज मानवास सत्‌चरित्र व शुचिर्भूत होण्याचीही सतत स्मरण देत असते.

## ३) जकात

'जकात' याचा अर्थ 'कर' देणे असा होतो. त्याचा दुसरा अर्थ 'महसूल' देणे असाही आहे. हा कर अथवा दान प्रत्येक मुस्लिमास बंधनकारक आहे. आपल्या उत्पन्नाचा २.५% म्हणजेच १/४० भाग जकाती पोटी द्यावा असा नियम, शिरस्ता आहे.

दानामुळे मानवी मनातील स्वार्थ व लालसेला पायबंद घालण्याचा इस्लामचा हा प्रशंसनीय प्रयत्न आहे. धनलोभ जगातील बहुतेक दुःखाचे कारण आहे. जकातीची रक्कम गोरगरीब, अडलेले, विधवा, अनाथ यांच्या कल्याणासाठी वापरली जाते. दीन दुःखिताचे दुःख दूर करणे हा अल्लाहचाच मार्ग आहे. समाजातील दलित-पीडित घटकाशी बंधुत्वाचे नाते जोडण्याचे काम जकात करते. साहजिकच देणाऱ्याच्या मनात त्यागाची भावना निर्माण होते. ही भावना अल्लाह आणि अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याशी भक्तिभाव जोडण्याचे काम करते.

## ४) रोजा

ईश्वराची आज्ञा पाळणाऱ्या मानवाला ईश्वराची आज्ञा मोडण्याचे धाडस होऊ नये म्हणून 'रोजाची' योजना इस्लाममध्ये केली आहे. एक महिन्याचे रोजे हे मानवाला शुध्द करून त्याचे अंतःकरण परिष्कृत करतात. दुर्वर्तनापासून दूर राहण्याची व संयमाची शिकवण 'रोजा' करण्यामुळे मानवास मिळते. अल्लाह आणि त्याचे प्रेषित यांची आज्ञा पाळण्याची भावना रोजेदाराच्या मनात प्रबळ होते. उपवासाने होणाऱ्या शारीरिक क्लेषामुळे अर्धपोटी वा उपाशीपोटी राहणाऱ्या दरिद्री माणसाच्या दुःखाची जाणीव होते. रोजामुळे मानवाला संकटे सोसण्याची क्षमता प्राप्त होते.

## ५) हज

'हज'ची यात्रा करणे इस्लाममध्ये महत्त्वाचे मानले जाते. ही यात्रा मक्का येथे काबागृहात भरते. ही यात्रा अल्लाहशी एकनिष्ठ राहण्यासाठी महत्त्वाची समजली जाते.

## ३) महापाप

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"अल्लाहच्या भक्तीमध्ये अन्य कोणाही देवदेवतांना सामावून घेणे, आईवडिलांची आज्ञा न पाळणे, कुठल्याही व्यक्तीची (विनाकारण) हत्या करणे व खोटी साक्ष देणे, हे इस्लामने फार मोठे गुन्हे मानले आहेत." - बुखारी, मुस्लिम

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी ज्या वर्तनास स्पष्टपणे मनाई केली आहे व निषिध्द मानले आहे, त्यास इस्लामने मोठे गुन्हे म्हणजे 'महापाप' मानले आहे. थोडक्यात कुरआनने व प्रेषित मुहम्मद (स.) यांनी ज्या गैर गोष्टींची मनाई केली आहे, त्याची लांबलचक यादी होईल. मात्र या यादीतील गुन्ह्यांपैकी वरील गुन्हे महापाप मानले आहे.

वरील हदीसच्या दुसऱ्या एका प्रतीत 'खोटी साक्ष'च्या ऐवजी 'खोटी शपथ' असाही उल्लेख येतो.

आणखी एका 'हदीस' मध्ये लिहिले आहे,

एका माणसाने विचारले की, "हे अल्लाहचे प्रेषित ! अल्लाहच्या दृष्टीने सर्वांत मोठा गुन्हा कोणता?" तेव्हा प्रेषितांनी उत्तर दिले,

"अल्लाहच्या भक्तीत अन्य देवदेवतांना सामील करून घेणे हे महापाप होईल. कारण अल्लाहनेच तुम्हास निर्माण केले आहे."

त्या गृहस्थाने पुन्हा विचारले, "त्या नंतरचा गुन्हा कोणता?"

त्यावर प्रेषित उतरले,

"आपल्या स्वतःच्या भोजनातून वाटा द्यावा लागेल म्हणून स्वतःच्या पोटी जन्मलेल्या मुलां-मुलींची कत्तल करणे त्यांना ठार मारणे वा पुरणे."

त्यानंतर त्या गृहस्थाने पुन्हा विचारले,

"त्यानंतरचा मोठा गुन्हा कोणता?"

"आपल्या शेजाऱ्याच्या पत्नीशी (वा अन्य स्त्रीशी) व्याभिचार (लग्नबाह्य संबंध) करणे." - बुखारी, मुस्लिम

तसेच अन्य एका 'हदीस' मध्ये प्रेषितांनी सांगितले,

"जे मानवास घातक आहेत, अशा सात गुन्ह्यापासून दूर राहा."

त्यावर एका साहबींनी (प्रेषितांच्या सहकार्यांनी) विनंती केली की, "ते सात गुन्हे कोणते?"

प्रेषित उत्तरले,

१) एकमेव ईश्वराबरोबर अन्य देवतांची (अनेकेश्वरवाद) भक्ति करणे.

२) जादूटोणा करणे.

३) अकारण रक्तपात व कत्तल करणे.

४) व्याजाचा धंदा करणे, व्याज घेणे.

५) अनाथांची संपत्ती गिळंकृत करणे.

६) धर्मयुध्दाच्या वेळी रणमैदान सोडून पलायन करणे.

७) स्वत:चे पातिव्रत्य जपणाऱ्या, ईश्वरावर श्रद्धा ठेवणाऱ्या व भोळ्याभाबड्या स्त्रियांवर स्वत:च्या स्वार्थासाठी खोटे दोषारोप लावणे. - बुखारी, मुस्लिम

आणखी एका 'हदीस' मध्ये अल्लाहचे प्रेषित महुम्मद (स.) यांनी सांगितले,

"व्यभिचार करणारा जेव्हा, व्यभिचार करतो त्यावेळी तो श्रद्धेच्या अवस्थेत नसतो. चोरी करणारा जेव्हा चोरी करतो, तेव्हा तो श्रद्धेच्या अवस्थेत नसतो. त्यांची धर्मश्रध्दा नष्ट झालेली असते. दारूडा जेव्हा दारू पितो, त्या वेळी त्याची ईश्वरावरील श्रध्दा ढळलेली असते. जेव्हा एखादा लुटारू, लूटमार करून लोकांना त्रास देतो व लोक ते पाहत असतात. आणि जेव्हा तुमच्यापैकी कुणी दगा करतो त्या वेळी त्यांच्या मनात श्रद्धा नसते, तर श्रद्धेच्या अवस्थेत दगा करत नाही.

"तेव्हा तुम्ही सर्वजण या दुष्कृत्यापासून दूर राहा." - बुखारी, मुस्लिम

याच 'हदीस' मध्ये आणखी एका साक्षीमध्ये कोणाही प्राण्याची विनाकरण कत्तल करण्यास मनाई करण्यात आली आहे.

वरील सर्व गुन्ह्यांना 'हदीस' मध्ये कुफ्र (एकेश्वरास नकार) निफाक (कपट) वा फिस्क (धर्माच्या नियमांचे उल्लंघन) म्हटले आहे. या कृत्याबद्दल नरकवासाची धमकी दिली आहे. या गुन्हेगारांना स्वर्गात प्रवेश मिळणार नाही, असे म्हटले आहे. ईश्वर त्यांच्यावर नाराज होईल. त्यांच्यावर दया दाखविली जाणार नाही.

याप्रमाणे वरील गुन्हे 'महापापात' गणले जातात.

याप्रकरणी पुढील प्रकरणात अधिक चर्चा होईल.

## ४) अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांचे आज्ञापालन

"माझ्या धर्मावर विश्वास ठेवणारे सर्वजण स्वर्गात प्रवेश करतील. माझे न मानणारे स्वर्गात जाऊ शकणार नाहीत."

त्यावर प्रेषितांना विचारले गेले,

"तुमच्या इंकार करणारे कोण असतील?"

"माझी आज्ञा मानणारे सर्व श्रध्दावंत स्वर्गास पात्र ठरतील व त्यास नकार देणारे निसंशय त्यांनी मला नाकारले." - बुखारी

वरील 'हदीस' तीन गोष्टी स्पष्ट करते.

१) अल्लाह व अल्लाहचे प्रेषितांना मानणारे सर्व श्रध्दावंतांना स्वर्गात प्रवेश मिळेल.

२) याचा दुसरा अर्थ असा की तेच लोक फक्त स्वर्गात प्रवेश करतील, जे अल्लाह व अल्लाहच्या हुकुमांची अंमलबजावणी करतील. हुकुमाच्या अधीन असतील.

दुसऱ्या शब्दांत हेच असे सांगता येईल, जे अल्लाह व अल्लाहच्या प्रेषितांच्या आदेशांची जाणूनबुजून अवहेलना करतील, ते स्वर्गात प्रवेश करू शकणार नाहीत. त्यांना नरकाग्नीत टाकले जाईल.

३) अल्लाह व अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांची काही अश्रद्ध जाणूनबुजून पायमल्ली करतात. आम्ही जे करतो ते जरी इस्लामविरुद्ध असले तरी तेच योग्य आहे असे मानतात. चुकीच्या वर्तनांत गुंग असतात. चुकीच्या विचारांवर अंमल करणारे थोडेही पश्चात्ताप पावत नाहीत. अल्लाहला व अल्लाहचे प्रेषितांना मानित नाहीत व नकार देतात. अशी माणसे समाजाला 'दाखविण्यापुरते' अल्लाहवर आणि अल्लाहचे प्रेषितांवर विश्वास ठेवल्यासारखे करतात. त्यांना धार्मिक म्हणता येणार नाही. त्यांना पाखंडी मानले जाईल. अशा दांभिकांना नरकाग्नीचीच वाट चालावी लागेल.

श्रध्दावंतांची कसोटी अल्लाहवर व अल्लाहचे प्रेषितावर ठेवलेल्या श्रध्देवरच मोजली जाईल.

## ५) प्रेषित मुहम्मद (स.) ईश्वराचे 'दास' आहेत.

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"मला मर्यादेपेक्षा जास्त श्रेष्ठ मानू नका. ज्याप्रमाणे ख्रिश्चनांनी मरियमपुत्र 'येशूला' ईश्वराचा पुत्र म्हणून त्याचे श्रेष्ठत्व वाढविण्याचा प्रकार केला.

"खरं तर, मी फक्त अल्लाहचा दास (सेवक गुलाम) आहे.

"म्हणून मला ईश्वराचा दास व प्रेषितच माना." - बुखारी, मुस्लिम

या 'हदीस'द्वारे आपल्या लक्षात येते की, अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) हे 'अंतिम प्रेषित' असून ते अल्लाहचे 'दास' आहेत. त्यांना मानवजातीच्या कल्याणासाठीच पाठविले आहे.

प्रेषित मुहम्मद (स.) हे फक्त अल्लाहचे दास आहेत. ते अल्लाहचे 'पुत्र' नाहीत. म्हणजे ते फक्त मानव असून अल्लाहचे आज्ञांकित आहेत. मानवी चेहरा व देह धारण करून प्रेषितांच्या रूपाने अल्लाहने 'अवतार' धारण केलेला नाही. ते फक्त मानवच आहेत. त्याचबरोबर अल्लाहचे सेवक, दास व दूत आहेत. मात्र ते सर्वश्रेष्ठ मानव असून त्यांच्यामध्ये ईश्वरीय शक्ति व ईश्वरीय प्रभाव नाही.

ख्रिश्चनांनी येशूंना बापाशिवाय जन्मलेला म्हणून अल्लाहचा पुत्र मानले. तर कधी प्रत्यक्ष ईश्वरच मानले. बाप, पुत्र व पवित्र आत्मा यांचा संयोग मानून एका ईश्वराची कल्पना केली आहे.

याप्रमाणे एका ईश्वरात तिघांचा मिलाफ करून एकेश्वरवादाचा भंग केला आहे. जे पवित्र कुरआन व 'हदीस' च्या विचारांच्या प्रतिकूल आहे. थोडक्यात सांगायचे म्हणजे ख्रिश्चनांनी अनेक देवतावाद स्वीकारला आहे.

मुस्लिमांनीही प्रेषित मुहम्मद (स.) बाबत असेच धोरण (ख्रिश्चनाप्रमाणे) स्वीकारून मुहम्मद (स.) यांना ईश्वर मानले व ईश्वरच मानवी चेहरा धारण करून प्रेषित रूपाने अवतरले आहेत असे मानले तर त्यांना ईश्वराचा दर्जा बहाल केला. तसे केल्यास ख्रिश्चनाप्रमाणे अनेक देवतावाद होईल.

## ६) ईश्वराच्या प्रेषितावर प्रेम

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जोपर्यंत तुम्ही तुमचे वाडवडील सर्व मानव पुत्र व नातवांपेक्षा माझ्यावर जास्त प्रेम करणार नाही, तोपर्यंत तुम्ही श्रध्दावंत होणार नाही." - बुखारी, मुस्लिम

वरील 'हदीस' वरून व अन्य अनेक 'हदीस' वरून आपल्या लक्षात येईल की जोपर्यंत आपल्या स्वकीयांपेक्षा व जगातील धनदौलतीपेक्षा अल्लाह व अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांच्यावर आपले जास्त प्रेम हवे. अशी प्रेम करणारी माणसेच खरी श्रध्दावंत म्हणवितात.

अल्लाहचे प्रेषितावर जास्तीतजास्त प्रेम करण्याचा अर्थ हा की प्रेषितांनी मार्गदर्शन केल्याप्रमाणे व दिलेल्या हुकुमाप्रमाणे मुस्लिमाने वर्तन करावे. त्याने स्वतःच्या आईवडील व मुलेबाळे यांच्या खुशी-नाखुशीची पर्वा न करता प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या आदेशाप्रमाणे वागण्यात स्वतःचे कल्याण समजावे. त्यांचे अनुयायी म्हणून त्याने शंभर नंबरी सोन्याप्रमाणे कसावर खरे उतरावे.

अल्लाहच्या प्रेषितावर प्रेम करण्याचा दुसराही एक असा अर्थ आहे की, अल्लाहचे प्रेषितांचे जीवनचरित्र आपल्या समोर ठेवून, त्यांनी मार्गदर्शन केल्याप्रमाणे व दिलेल्या आदेशांप्रमाणे निर्मल जीवनाचा मार्ग चोखाळावा. प्रेषितांनी स्वीकारलेले जीवनध्येय, त्यांची वर्तनदिशा ही जगातील अन्य मानवांच्या जीवनध्येयापेक्षा, श्रेष्ठ मानून, त्याप्रमाणे आपले वर्तन ठेवावे. त्यांचे जीवनध्येय अल्लाहच्या आदेशामुळे आदर्श झाले असल्यामुळे, मानवानेही प्रेषिताप्रमाणे वर्तन ठेवावे. आमचा प्रयत्न त्यांचा जीवनधडा गिरवण्याचा असावा.

प्रेषितावर प्रेम करण्याचा तिसरा अर्थ असा की जो धर्म त्यांच्यावर अवतरला, जो धर्म त्यांना जीवापाड प्रिय होता, ज्याच्या प्रचार व प्रसारासाठी त्यांनी अनंत यातना सोसल्या, रक्तबंबाळ झाले, उपास-तापास सहन केले, घरदार सोडून दिले व ज्यासाठी शेवटच्या श्वासापर्यंत अतोनात कष्ट केले, त्या धर्माचा सर्व जगभर प्रभाव पडावा म्हणून आम्ही प्रयत्न केले पाहिजेत. त्यासाठी सर्वस्वाचा त्याग करण्याची मनाची तयारी ठेवावी.

स्वतः धर्मभ्रष्ट न होता व स्वतःच्या सुखासाठी आलेली प्रलोभने लाथाडून प्रेषितांशी एकनिष्ठ राहावे.

प्रेषितावर प्रेम करण्याचा चौथा अर्थ असा आहे की प्रेषित व त्यांच्या परिवारासाठी त्याच्या सहकाऱ्यांसाठी जे प्रेषितांच्या मार्गावर अग्रेसर झाले आहेत व इस्लामच्या प्रचारासाठी निकडीचे प्रयत्न केले आहेत, त्यांच्या कल्याणासाठी ईश्वरचरणी प्रार्थना करावी.

आमच्या प्रिय प्रेषितांनी आमच्यावर अनंत उपकार केले आहेत. आम्ही त्यांच्यासाठी अल्लाहकडे प्रार्थना करण्याशिवाय काही करू शकत नाही. नमाजपूर्वी आणि नमाजनंतरही जेव्हा सवड सापडेल तेव्हा प्रेषितांसाठी व त्यांच्या मुलाबाळासाठी परमेश्वराकडे आशिर्वाद मागावा.

आपल्या स्वतः शिवाय इतरासाठी मांगल्याची प्रार्थना (दुवा) मागणे हेही प्रेमच आहे. त्यामुळे अल्लाह, अल्लाहचे प्रेषित व त्यांच्या अनुयायांबद्दल प्रेम वाढते.

## ७) पाखंडी (मुनाफिक)

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"'दांभिक' म्हणजे त्या भटकणाऱ्या शेळीसारखे आहेत, जी शेळी कधी या चाऱ्यावर तर कधी त्या चाऱ्यावर ताव मारत फिरत असते." - मुस्लिम

धर्मश्रद्ध, मुस्लिम ईश्वराचे एकमेवाद्वितीयत्व व त्याचे सार्वभौमत्व, प्रेषिताचे दूतत्व, सत्यता सच्चेपणा आणि न्यायाच्या शेवटच्या दिवसावर विश्वास ठेवतो. म्हणून सच्चा मुस्लिम अल्लाहचे दासत्व स्वीकारून त्याच्यावर विश्वास ठेवतो.

त्याचबरोबर इतर सर्व धर्म, कायदे आणि निरनिराळे वाद आणि दृष्टिकोन यांचा त्याग करून तो इस्लामशी एकरूप होतो. तो फक्त इस्लामवर श्रद्धा बाळगतो.

वरील वर्तनाविरुध्द पाखंडी माणसाचे वर्तन असते. पाखंडी श्रद्धा आणि विश्वास यापासून शेकडो मैल दूर असतो. तो दही खाऊ की साय खाऊ, कधी हे तर कधी ते या स्वार्थी विचारात गुरफटून चंचलपणे वागतो. त्याची चंचल वृत्ती त्याला एका ठिकाणी स्थिर श्रध्दा ठेवू देत नाही.

कधी तो एकमेव ईश्वराला शरण जातो, तर कधी स्वत:च्या चंचलवृत्तीच्या अधीन जाऊन राक्षसी वृत्तीचा अंगीकार करतो. कधी इस्लामचे गुणगान करतो तर कधी दुष्प्रवृत्तीच्या आहारी जाऊन अल्लाहशिवाय इतर देवदेवतांच्या पूजेसाठी कटिबध्द होऊन, इस्लामशी द्रोह करतो. पाखंडी माणसाचे दुटप्पी वर्तन असते. कधी इस्लामची कड घेतो तर कधी अनेकेश्वरवादाकडे झुकतो. पाखंडी माणूस स्वत:च्याच स्वार्थाचा विचार करून वागतो. त्याग करणे त्याच्या गावीही नसते. पाखंडी माणसाचे मन कपटाने ग्रासलेले असते. त्याचे अंत:करण कधीही स्वच्छ नसते. तो कोठेही एके ठिकाणी श्रध्दा ठेवित नाही त्यामुळे स्वत:चाच स्वत: शत्रू असतो.

## ८) कपटी माणसाची ओळख

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"खालील चार त्याज्य गोष्टींपैकी एकही बाब ज्याच्या अंगी असेल, अशा माणसास 'दांभिक' माणूस घोषित करावयास हरकत नाही. त्या चार गोष्टी पुढीलप्रमाणे,

१) ज्याच्याजवळ विश्वासाने अनामत ठेव दिली असता तिचा अपहार करणे.

२) बोलतांना जाणूनबुजून खोटे बोलणे.

३) वचन देऊन ते पूर्ण न करणे.

४) भांडण करतांना शिवीगाळ करणे." - बुखारी, मुस्लिम

दंभाचा संबंध मनाशी आहे. कपटी माणसाचे मन श्रध्दा व भक्तीपासून दूर असते. त्याचे मन शंका आणि श्रध्दाहीनता यांनी परिपूर्ण असते. श्रध्देप्रमाणे श्रद्धाहीनतेची सहजपणे ओळख पटवता येते. त्यावरून दांभिक माणूस सहज ओळखता येतो. या 'हदीस'मध्ये दांभिक माणसाची चार लक्षणे सांगितली आहेत. या 'हदीस'मध्ये स्पष्ट केले आहे की दुसऱ्यास धोका देणे, दुसऱ्या व्यक्तीने सांभाळण्यास दिलेली ठेव गिळंकृत करणे (अपहार करणे), दिलेले वचन पूर्ण न करणे व भांडणे करून शिवीगाळ करणे या चार गोष्टी ज्याच्या वर्तनात दिसतील, तो माणूस खुशाल दांभिक समजावा. एवढेच नव्हे तर त्यास पाखंडी समजावे.

याच्या उलट ज्या माणसामध्ये दुसऱ्याची अनामत सांभाळून ज्याची त्यास परत करणारा, खरं बोलून दिलेल्या शब्दास जागणारा, तडजोड व युध्दामध्ये न्याय व सभ्यपणाने वागणारा, जिभेवर लगाम ठेवणारा सद्गुणी माणूस समजावा. ज्यांप्रमाणात माणसामध्ये वरील सद्गुण असतील त्यास ईमानदार म्हणावे.

## ९) खरा मुस्लिम

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ज्याच्याकडून हाताने व वाचेने मुस्लिमाचे (श्रद्धावानाचे) कसलेही नुकसान होत नाही तोच खरा मुस्लिम होय. तसेच अल्लाहने मनाई केलेले काम जो सोडून देतो, त्यास (धर्मासाठी देशत्याग केलेला) म्हणावे."
- बुखारी, मुस्लिम

सच्चा श्रद्धावान व (धर्मासाठी देशत्याग केलेला) कोणास म्हणावे हे या 'हदीस' (प्रेषित वचन) ने स्पष्ट केले आहे.

सच्चा श्रद्धावान कोणा श्रद्धावानास दुखवीत नाही. त्यास शारीरिक व मानसिक दुःख देत नाही. श्रद्धावानाच्या पाठीमागे चहाडी-चुगली अथवा निंदा करीत नाही. त्याची चेष्टामस्करी करीत नाही. एकाही श्रद्धावानावर दोष ठेवून खोटा आरोप करीत नाही. शिवीगाळ करीत नाही. त्याला शब्दानेही दुखवित नाही. सच्चा मुस्लिम आपल्या शक्तीचा दुरुपयोग करून त्रास देत नाही. एखादा मुस्लिम त्याचा वैरी असला तरी त्याचे वाईट चिंतित नाही.

'मुहाजिर' म्हणजे ज्याने अल्लाह व इस्लामसाठी स्वतःचे घरदार सोडून अन्य ठिकाणी स्थलांतर केले आहे. त्याच्या मूळ राहण्याच्या ठिकाणी त्याला इस्लामचे पालन व प्रचार-प्रसार करण्यास आडकाठी येत असल्यामुळे स्वधर्म संरक्षणार्थ स्थलांतर करावे लागते. मक्केमध्ये नवमुस्लिमांचा कुरैशानी अनन्वित छळ केला. त्यांचे तेथे राहणे दुष्कर केले, त्यामुळे मक्केतील मुस्लिमांनी मदिनेस स्थलांतर केले. त्या स्थलांतरास 'हिजरत' म्हटले जाते. धर्मासाठी 'हिजरत' करणे पुण्यकृत्य समजले जाते. हा फार मोठा त्याग आहे. धर्मासाठी 'हिजरत' करणारास सच्चा मुस्लिम समजण्यात येते.

स्वतःचे मूळ गाव, घरदार सोडणे हे वरवरचे कृत्य होय. मात्र हिजरतचा दुसराही एक अर्थ सांगितला जातो. मुस्लिमाने अल्लाहला जे काम अप्रिय आहे, त्याने ज्या कामास मनाई केली आहे ते काम सोडणे, न करणे म्हणजे दुष्कृत्यांचा त्याग करणे होय, यासच 'हिजरत' असेही म्हटले जाते. अल्लाहने जी दुष्कृत्ये सोडण्यास सांगितले आहे, ती सोडली नाहीत आणि स्थलांतर करावे लागले. तरी त्यास हिजरतचे पुण्य मिळणार नाही व सच्चा मुस्लिमही समजले जाणार नाही.

## १०) धर्मनिष्ठ मुसलमान

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"माझे प्राण ज्याच्या हातात आहेत, त्या ईश्वराची शपथ, कोणीही 'धर्मनिष्ठ' मुस्लिम म्हणवून घेण्यास तोपर्यंत पात्र नाही, जोपर्यंत त्यास आपल्या धर्मबांधवासाठी ते सर्वकाही मिळावे असे वाटेल, जे त्याला मिळावेसे वाटते."
- बुखारी, मुस्लिम

धर्मनिष्ठ मुस्लिम कोणास म्हणावे हे या प्रेषितवचनामध्ये सांगितले आहे.

प्रत्येक मनुष्य स्वत:चेच भले इच्छितो. कधीही स्वत:चे वाईट व्हावे, असे त्याला वाटत नाही. त्याला नेहमी स्वत:च्या यशाची व सफलतेची काळजी वाटत असते. अल्लाहचे प्रेषितांचे म्हणणे असे आहे, ज्याप्रमाणे मनुष्य स्वत:चेच भले इच्छितो, तो स्वत:चे कधीही वाईट चिंतीत नाही. त्याचप्रमाणे धर्मनिष्ठ मुस्लिमाने दुसऱ्या मुस्लिमांचे शुभ चिंतावे. अशुभ चिंतू नये. ज्याप्रमाणे धर्मनिष्ठ मुस्लिम स्वत:ची प्रगती व्हावी, असे चिंतितो, त्याचप्रमाणे दुसऱ्या मुस्लिमांची प्रगती व यश चिंतावे. खरे पाहता एका धर्मनिष्ठ श्रद्धावानाचा दुसरा श्रद्धावान बंधु असतो, तेव्हा त्याने दुसऱ्या श्रद्धावानांच्या यशाने खूश झाले पाहिजे. त्यांच्या अपयशाने व दु:खाने 'धर्मनिष्ठ' श्रद्धावानास दु:ख झाले पाहिजे. दुसऱ्या श्रद्धावानाच्या दु:खाने व संकटाने जो खूश होतो, तो धर्मनिष्ठ श्रद्धावान असू शकत नाही.

शेवटच्या दिवशी (न्यायदानाच्या दिवशी) अल्लाहकडून यश (स्वर्गप्रवेश) मिळणे हे फार मोठे यश आहे. तसेच त्या दिवशी नरक मिळणे हे फार मोठे अपयश आहे. म्हणून अश्रध्द मुस्लिमांचे प्रथम कर्तव्य आहे की त्याने अल्लाह, अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या आदेशाप्रमाणे वागून सच्चा श्रद्धावान बनण्याचा प्रयत्न केला पाहिजे. म्हणजे शेवटच्या दिवशी त्याला यश मिळेल.

## ११) श्रध्दावंतांचे खरे नाते

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"एका धर्मनिष्ठ मुस्लिमाने दुसऱ्या धर्मनिष्ठ मुस्लिमाला भिंतीप्रमाणे आधार देऊन प्रबल बनविले पाहिजे. याप्रमाणे (प्रेषितांनी हाताची पाची बोटे जुळवून दाखविली)."

- बुखारी, मुस्लिम

श्रध्दावंतांची मने आपसात जुळलेली असतात. त्यांचे आपसात प्रेमाचे व आपुलकीचे संबंध असतात. धर्मनिष्ठ मुस्लिम संघटित व एका दिलाने वागतात. ज्याप्रमाणे भिंतीच्या विटा एकसंघ झालेल्या असतात.

सुट्या सुट्या विटा जेव्हा एकत्रित रचून भिंत तयार होते, तेव्हा त्यात मजबुती व भक्कमपणा येतो. प्रत्येक वीट दुसऱ्या विटेस शक्ती प्रदान करते. याप्रमाणे विटा एकत्रित येऊन प्रचंड शक्ती निर्माण करतात.

नेमके श्रध्दावंताचे वर्तन असेच असावे. त्यांनी आपसातील बंधुभाव वाढवावा. शिस्त आणि संघटनाद्वारे एकमेकास शक्ती प्रदान करून धर्मास बळकटी आणावी. धर्मश्रद्ध जीवन नौकेत कधीही एकटा नसतो. एका श्रध्दावंताचे सुख-दु:ख हे सर्वांचेच असते. खऱ्या इस्लामी समाजाची स्तुती करताना अल्लाहच्या प्रिय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"एका शरीराच्या अवयवांप्रमाणे सर्व मुस्लिमांनी एकत्र राहून दया व आपुलकी दाखवून प्रेमाने राहावे. ज्याप्रमाणे शरीरातील एका अवयवास जखम झाली असताना, सर्व

शरीर तापाने फणफणते व त्या अवयवाच्या मदतीला पूर्ण शरीर धावते, तसेच श्रध्दावंतांनी एकमेकांशी वर्तन ठेवावे.''

- बुखारी, मुस्लिम

ही बाब तेव्हाच अमलात येऊ शकते जेव्हा मुस्लिम समाजाचा पाया अल्लाह व अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या मार्गदर्शनावरच आधारलेला असेल. ईश्वरी धर्माच्या जयजयकारासाठी सर्व श्रद्धावान संघटित होतील तेव्हाच असे होईल.

## १२) आई-वडिलांची सेवा

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

''त्यांच्या तोंडात माती पडो! त्यांच्या तोंडात माती पडो! त्यांच्या तोंडात माती पडो!''

त्यावर प्रेषितांना विचारले गेले, ''कोणाच्या तोंडात माती पडेल?''

त्यावर प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

''ज्यांनी आई-वडील दोघांची अथवा एकाची म्हातारपणी सेवा केली नाही, तो स्वर्गात कधीही प्रवेश करू शकणार नाही.''

- मुस्लिम

ज्याने आई-वडिलांची सेवा केली नाही, तो कधीही स्वर्गात प्रवेश करू शकणार नाही. ज्याने अल्लाहला प्रसन्न करण्यासाठी आई-वडिलांची सेवा केली आहे, तो स्वर्गाचा अधिकारी राहील. असे या हदीसने स्पष्ट केले आहे.

या हदीसमध्ये म्हातारपणाचा उल्लेख मुद्दाम केला आहे. कारण म्हातारपणीच आई-वडिलांना सेवेची अत्यंत आवश्यकता असते. म्हातारपणामुळे ते हतबल व चिडखोर झालेले असतात. या वृध्दावस्थेत त्यांना काही काम नसते. मुलांना आईवडील ओझे वाटू लागतात.

आणखी एका 'हदीस'मध्ये सांगितले आहे,

एका माणसाने विचारले, ''हे ईश्वराच्या प्रेषिता! संततीवर आई-वडिलांचा काय अधिकार आहे?''

प्रेषितांनी उत्तर दिले, ''आई-वडील मुलांचा स्वर्ग आणि नरक आहे.'' - इब्ने माजा

म्हणजे त्यांची सेवा केल्याने स्वर्ग तर अवज्ञा केल्याने नरक मिळेल.

एका अन्य हदीसमध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

''सर्वांत मोठे पुण्य म्हणजे, मानवाने आपल्या वडिलानंतर वडिलांच्या मित्रांना तेवढाच मान द्यावा.''

- मुस्लिम

आई-वडिलांच्या सेवेबरोबरच त्यांच्या नातेवाईकांवर व त्यांच्यावर प्रेम करणाऱ्यांशी चांगला व्यवहार करावा.

## १३) पुत्र आणि घरच्या माणसांची जबाबदारी

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ऐका, तुमच्यापैकी प्रत्येकजण कोणाचा ना कोणाचा संरक्षक आहे. त्यामुळे शेवटच्या दिवशी अल्लाह तुमची विचारपूस (तुमच्या संरक्षितांचे तुम्ही संरक्षण केले किंवा नाही) करील." - बुखारी, मुस्लिम

वरील 'हदीस' ही एका मोठ्या 'हदीसचा सुरवातीचा भाग आहे. तो पुढीलप्रमाणे-

"जे सरदार अधिकारी आहेत त्यांना त्यांच्या अधिकाराखाली संरक्षणासाठी दिलेल्या लोकांचे त्यांनी संरक्षण केले किंवा कसे? या बाबतीत (अल्लाहकडून) त्यांना विचारणा होईल. कुटुंबप्रमुखांना त्यांच्या कुटुंबियांबाबत विचारणा होईल. स्त्रीवर तिच्या पतीच्या घराबाबत विचारणा होईल. कारण तिच्यावर घरादाराची व मुलाबाळांची जबाबदारी आहे. गुलाम मालकाच्या मालमत्तेच्या संरक्षणास जबाबदार आहे, त्याबाबत त्याला विचारले जाईल. याप्रमाणे तुमच्यातील प्रत्येकजणास त्याच्या ताब्यातील लोकांबाबत विचारले जाईल." अशाप्रकारे तुम्हापैकी प्रत्येकजण जबाबदार आहे. - बुखारी, मुस्लिम

या 'हदीस'वरून लक्षात येते की एखाद्या वस्तूची अथवा लोकांची ज्याच्यावर जबाबदारी टाकली आहे, (ती पार पाडली आहे किंवा नाही) त्याबाबत विचारले जाईल. कोणाची ठेव बुडविली तर नाही ना? त्याबाबत लपवा-छपवी तर केली नाही ना? अशीच विचारणा सत्ताधाऱ्यांनाही होईल. त्यांनी जनतेबाबत आपली कर्तव्ये पार पाडली की नाहीत? गुलामांनी मालकांच्या मालमत्तेचे संरक्षण केले का? अशीच विचारणा प्रत्येक माणसाला त्याच्या संरक्षिताबाबत होईल. तशीच विचारणा स्त्रीला तिच्या घराबद्दल व मुलाबाळांबद्दल होईल.

## १४) पत्नीशी चांगली वागणूक

अल्लाहच्या प्रिय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"हे संपूर्ण जग काही दिवसांचे आहे. या जगातील सर्वांत चांगली वस्तू सत्चरित्र पत्नी आहे." - मुस्लिम

स्त्रीबाबत बहुतेक धर्माचा कल असा आहे की ती तिरस्करणीय व पापाचे मूळ आहे."

याउलट पाश्चिमात्य राष्ट्रांत स्त्रीला फक्त कामवासना व वासनेची पूर्तता करण्याचे साधन मानले जाते. त्यामुळे पाश्चिमात्य राष्ट्रात अश्लीलता व बेशरमपणा सार्वत्रिक झाला आहे. कुटुंबसंस्था व सामाजिक बंधने तुटून इतस्ततः झाली आहेत. याच्याउलट इस्लामने सज्जन व शीलवान स्त्रीस सर्वोच्च स्थान दिले आहे. तसेच तिला अनन्य महत्त्व दिले आहे.

एका अन्य 'हदीस' मध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

''स्त्रियांशी चांगले वर्तन ठेवण्याबाबत जी ताकीत दिली आहे ती मान्य करा. तिची निर्मिती (प्रथमपुरुष आदम) फासळीपासून झाली आहे. सर्वात उंच (वरची) फासळी मुळातच जास्त वाकडी असते. जर ती फासळी सरळ करण्याचा प्रयत्न कराल, तर ती तुटेल. तिला जशी आहे तशीच राहू द्या. ती वाकडीच राहील. स्त्रियांबाबत मी प्रमाणित केलेले मतच मान्य करा.''

- बुखारी, मुस्लिम

वरील 'हदीस' मध्ये स्त्रियाचे वर्तन फासळीप्रमाणे वाकडे असते असे सांगितले आहे. ज्याप्रमाणे फासळी निसर्गत:च वक्र असते, त्याप्रमाणे स्त्रियांचे वर्तन असते. स्त्रियांचे जे वाकडे वर्तन असते, तेच फायदेशीर आहे. तिचे वर्तन सरळ होऊ शकत नाही. तिला सरळ करण्याचा प्रयत्न केल्यास ती तुटेल आणि निरुपयोगी होईल. त्याचबरोबर स्त्रिया पुरुषापेक्षा जास्त भावनावश असतात. त्यांची ही भावनाविवशता फायदेशीर असते. स्त्रिया भावविवश नसत्या तर संसाराचे ओझे उचलू शकल्या नसत्या. त्या भावुक आहेत, म्हणूनच संसाराचे ओझे उचलू शकतात. नऊ महिने आपल्या अपत्याचे ओझे सांभाळणे, नंतर वर्षानुवर्षे त्याची काळजी घेणे, त्यासाठी अनंत कष्ट घेणे, घरातील नित्य नैमित्यिक कामे व पती महाशयांचे अनेक नखरे सांभाळणे, स्त्री जर भावुक नसती तर हे सगळे अशक्य होते. स्त्री ही भावुकतेमुळे हा सगळा गाडा ओढीत असते.

अशा स्वभावामुळे पुरुष गोंधळू शकतो, पण स्त्री निसर्गत: फासळीप्रमाणे आहे. त्यामुळे तिच्यात बदल अपेक्षित नाहीत. स्त्रियांची भावुकता एका अर्थाने फायदेशीर व दुसऱ्या अर्थाने उणीव आहे.

पुरुषांनी स्त्रियांशी वागताना वरील गुण व अवगुणांचा विचार करुन वागले पाहिजे. स्त्रियांशी जास्तीतजास्त चांगले वर्तन ठेवले पाहिजे. त्यामुळे स्त्रियांच्या भावुकतेचा जास्तीतजास्त उपयोग करून घेता येईल. पुरुषाने स्त्रियांशी कडक वर्तन केले, तर त्याला त्यांच्या सहवासास मुकावे लागेल. त्यामुळे स्त्रीची सुधारणा होणार नाही.

एका दुसऱ्या 'हदीस' मध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

''कोणाही मुस्लिमाने मुस्लिम स्त्रीचा तिरस्कार करू नये. तिचा एक गुण पसंत नसेल तर दुसरा गुण पसंत असेल.''

- मुस्लिम

म्हणजे पत्नीच्या नापसंत गुणांचा विचार न करता तिच्या सद्‌गुणांचा विचार करावा.

एक अन्य 'हदीस' मध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

''तुमच्यापैकी कोणीही आपल्या पत्नीला गुलामाप्रमाणे मारू नये. कारण दिवस मावळल्यानंतर तुम्हास तिच्याशी सहवास करावयाचा आहे.''

- बुखारी, मुस्लिम

पत्नीशी वागताना लक्षात ठेवले पाहिजे की ती तुमची नोकर नाही. तुमचे तिच्याशी खरे नाते प्रेमाचे आहे. तुम्ही तिला मारहाण करून क्रुरतेची वागणूक देऊ नये.

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"तुमच्यापैकी सर्वात चांगला माणूस तो आहे, जो घरातील लोकांशी चांगले वर्तन करतो. जो माणूस घरातील सदस्यांशी वाईट वर्तन करतो, तो वाईट समजावा. मी माझ्या घरातील सदस्यांशी चांगले वर्तन करतो." - तिर्मिजी, दारमी व इब्ने माजा

## १५) पतीची आज्ञा पाळणे

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"पतीने पत्नीस अंथरूणावर बोलावले व ती 'नाही' म्हणाली, तिच्या पतीस राग आला तर सकाळ होईपर्यंत देवदूत तिला धिक्कारतील."

- बुखारी, मुस्लिम

आणखी एका 'हदीस' मध्ये सांगितले गेले आहे,

"एखाद्या स्त्रीवर तिचा पती खूश असता तिला मृत्यू आल्यास ती स्त्री स्वर्गाची अधिकारी होईल." - बुखारी, मुस्लिम

एका दुसऱ्या 'हदीस' मध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जेव्हा पतीने पत्नीस आपल्या गरजेसाठी बोलावले, तर तिने त्वरित पतीजवळ गेले पाहिजे. ती स्त्री स्वयंपाक करीत असली तरी." - तिर्मिजी, हाकिम

या 'हदीस'वरून आपल्या लक्षात येईल की स्त्रियांचे कर्तव्य आहे, त्यांनी आपल्या पतीस खूश ठेवावे. पतीच्या प्रत्येक योग्य कामात सहकार्य करावे. हेच तिच्या लौकिक व पारलौकिक यशाचे गमक आहे.

## १६) नातेवाईकांशी वर्तन

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"(नातेसंबंध) तोडणारा स्वर्गात प्रवेश करू शकणार नाही." - बुखारी, मुस्लिम

पवित्र कुरआनने अल्लाहच्या भक्तीनंतर मुस्लिमाने मानवाशी कसे वर्तन ठेवावे, हे सांगून त्यावर भर दिला आहे. या वर्तनाची सुरूवात आईवडील व नातेवाईकापासून केली आहे. त्यांच्याशी चांगले वर्तनच अपेक्षित आहे.

जसे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"आणि ईश्वराला शरण जा. ईश्वराच्या भक्तीमध्ये कोणत्याही अन्य देवदेवतांना सामील करून घेऊ नका. तसेच आई-वडिलांशी चांगले वर्तन करा. त्याचप्रमाणे नातेवाईक, अनाथ, गरीब, शेजारी-पाजारी, अनोळखी व्यक्ती, प्रवासी व गुलामाशी चांगले वर्तन ठेवा."

या 'हदीस' मध्ये आईवडील व नातेवाईकांचे हक्क व अधिकार यांना महत्त्व दिले आहे. जी व्यक्ती आईवडिलांचे व नातेवाईकांचे संबंध तोडून टाकेल, त्यांचे हक्क त्यांना अदा करणार नाही, ती स्वर्गात प्रवेश करू शकणार नाही. नातेवाईकांच्या हक्कांना योग्य ठरविताना प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

''नातेवाईकांच्या उपकारामुळे त्यांना मदत करणारा असा, उपकाराच्या परतफेडीसाठी प्रतिउपकार करणारा असा 'हक्क अदा करणारा' याचा अर्थ नाही. तर एखाद्या नातेवाईकाने अपकार केला व संबंध तोडले तरी त्याच्यांशी प्रेमाने वागून त्यांना मदत करणारा त्यांच्याशी संबंध जोडून, त्यांना मदत करणारा असा 'हक्क अदा करणारा' या शब्दांचा अर्थ आहे.''

- बुखारी

## १७) अनाथांचे पालनपोषण

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

''जो मनुष्य आपल्या किंवा परक्या अनाथांच्या खाण्यापिण्याची, इत्यादी व्यवस्था करेल, तो माझ्याबरोबर स्वर्गात याप्रमाणे राहील.''

प्रेषितांनी एवढे बोलून, अंगठा व त्याजवळची तर्जनी जवळ आणून मात्र त्यात थोडे अंतर ठेवून इशारा केला व त्यामध्ये थोडेसेच अंतर ठेवले.

- बुखारी

जगात सर्वांत वाईट वर्तन अनाथाबरोबर केले जाते. दुसरे काहीजण अनाथाकडे तिरस्काराने पाहतात त्यांना धक्के मारतात. अनाथांचे रक्षणकर्ते म्हणविणारेही त्यांच्याशी चांगले वर्तन करीत नाहीत. उलट त्यांची मालमत्ता हडप करतात. अनाथाश्रमातही त्यांच्याकडे तिरस्काराने पाहिले जाते. त्यांना भीक मागण्यास भाग पाडले जाते. अनाथालयात अनाथांनी आणलेल्या भिक्षेच अपहरण केले जाते.

कुरआन मध्ये ईश्वराने सांगितले,

''जे अनाथांची मालमत्ता कसलाही अधिकार नसताना खातात ते स्वत: अग्नी भक्षण करतात. ते निश्चितपणे नरकाचेच (जहन्नुम) धनी होतील.''

पवित्र कुरआन सुरह अन्निसा ४:१०

या सूरहमध्ये अनाथांची देखभाल आणि त्यांच्याबरोबर चांगल्या वर्तनाचे महत्त्व सांगितले आहे. अनाथ आपला नातेवाईक असो अथवा नसो, जो त्यांची जबाबदारी स्वीकारेल, तो प्रेषित मुहम्मद (स.) बरोबर त्यांच्याजवळ राहील. जसे अंगठा व तर्जनीमध्ये अगदी थोडे अंतर असते तसे.

## १८) शेजाऱ्याशी चांगले वर्तन

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ईश्वराशपथ तो सच्चा मुस्लिम नाही ! ईश्वराशपथ तो सच्चा मुस्लिम नाही! ईश्वरा शपथ तो सच्चा मुस्लिम नाही.!"

त्यावर एका माणसाने विचारले,

"कोण सच्चा मुस्लिम नाही?"

त्यावर प्रेषित मुहम्मद (स.) यांनी उत्तर दिले,

"तो, ज्याचा शेजारी त्याच्या त्रासाने व वर्तनाने त्रासला असेल." - बुखारी, मुस्लिम

पवित्र कुरआनने जसा अल्लाहच्या भक्तीवर जोर दिला आहे, त्याप्रमाणे त्याने सभोवतालच्या लोकांना मदत व सहकार्य केले पाहिजे. यावरून हे सिध्द होते की धर्माचे पायाभूत दोन मुद्दे आहेत. एक (भक्ती) सरळ अल्लाहशी संबंधित विषय आहे व दुसरा अल्लाहच्या भक्तांशी संबंधित आहे.

वरील दोन्ही बाबी फार महत्त्वाच्या आहेत. जेथे अल्लाहच्या दासाशी वर्तणुकीचा संबंध येतो त्यासंबंधी पुढीलप्रमाणे मार्गदर्शन केले आहे. त्यामध्ये आईवडील, अनाथ, गरिबाबरोबरच शेजाऱ्याशी चांगले वर्तन ठेवण्याचाही निर्देश केला आहे. वरील हदीसमध्ये हीच बाब स्पष्ट केली आहे की शेजाऱ्याशी चांगले वर्तन ठेवणे आवश्यक आहे. या हदीसमध्ये स्पष्ट केले आहे, "जो शेजाऱ्याशी चांगले वर्तन ठेवणार नाही, तो अश्रध्द गणला जाईल."

आणखी एका हदीसमध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जिब्रिल (देवदूत) मला शेजाऱ्याशी चांगले वर्तन ठेवण्याबाबत सक्त ताकीत देत होते. मला असे वाटू लागले की ते (देवदूत) शेजाऱ्याला वारसदार बनवतील."

- बुखारी, मुस्लिम

दुसऱ्या एका हदीसमध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जो ईश्वरावर व शेवटच्या दिवसावर (न्यायदानाचा दिवस) विश्वास ठेवतो, त्याने शेजाऱ्याशी चांगले संबंध ठेवावेत." - बुखारी, मुस्लिम

## १९) विधवा व गरिबांची सेवा

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"विधवा आणि गरिबांना मदत करणारा हा ईश्वरी आदेशावर चालणाऱ्या व त्या आदेशाची अंमलबजावणी करणाऱ्या 'धर्मयोद्धा' व्यक्तीप्रमाणे श्रेष्ठ आहे."

एका प्रत्यक्षदर्शीने मला असे वाटते प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले की,

"मला असे वाटते की विधवा आणि गरिबांना मदत करणाऱ्या माणसाला, ईश्वराची सतत भक्ती करणाऱ्या, रात्ररात्र अल्लाहच्या प्रार्थनेत जागणाऱ्या, अल्लाहच्या भक्तीत लीन असणाऱ्या, अल्लाहच्या आदेशाप्रमाणे 'रोजे' (उपवास) करणाऱ्या 'सच्चा मुस्लिमांच्या' पंक्तीत बसविले आहे." - बुखारी, मुस्लिम

पवित्र कुरआनमध्ये जेथे जेथे अल्लाहच्या मानवावरील हक्कांचा व अधिकाराचा तपशील आला आहे, तेथे तेथे विधवा, गरीब व अनाथांना मदत करण्याची ताकीत दिली आहे.

पवित्र कुरआनात एके ठिकाणी म्हटले आहे,

"आणि यांच्या (मुस्लिमांच्या) संपत्तीमध्ये मागणाऱ्या व न मागणाऱ्या (रिकाम्या हातांच्या) गरिबांचा वाटा आहे." कुरआन, सूरह अज़्ज़ारियात् ५१:१९

यावरून आपल्या लक्षात येईल की विधवा आधारहीन गरीब आणि दीन दुःखी मानवांचे कल्याण इच्छिणाऱ्या, त्यांचे चांगले व्हावे असे वाटणाऱ्या, त्यांची निगराणी करणाऱ्या, त्यांची तन, मन व धनाने सेवा करणाऱ्या माणसास अल्लाह सद्भक्ताप्रमाणे स्थान देतो.

जो भक्त रात्रंदिवस ईश्वरभक्तीत रमला आहे. नमाज व रोजेधारक आहे, त्याच्या पंक्तीत विधवा व गरिबांची सेवा करणाऱ्या भक्तास बसवितो.

ईश्वर करो ! तुम्ही व आम्ही या पुण्याईचे वाटेकरी होवोत. (तथास्तु / आमीन)

## २०) दया

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जो माणसावर दया करीत नाही, ईश्वर त्याच्यावर दया करीत नाही."

- बुखारी, मुस्लिम

या हदीसवरून आपल्या लक्षात येते की जो मानवावर दया करीत नाही त्याच्यावर या जगात व न्यायदानाच्या दिवशी ईश्वर दया करणार नाही. मेहेरबानी करणार नाही. अरेरे! ज्याच्यावर अल्लाह दया करणार नाही, त्याची काय दशा होईल? त्याचे लौकिक व पारलौकिक जीवन उद्ध्वस्त होईल.

परंतु एखाद्या माणसाने दुसऱ्या माणसावर दया केली, त्याच्या उपयोगी पडला, त्याच्या चुका माफ केल्या तर, अल्लाहसुध्दा त्याच्यावर दया करेल. मेहरबान होईल.

एका अन्य हदीसमध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"दया करणारावर 'रहीम' (दयाळू अल्लाह) दया करेल. जमिनीवर राहणाऱ्यावर दया करा, आकाशाचा स्वामी (ईश्वर) तुमच्यावर दया करेल." - अबु दाऊद, तिर्मिजी

वरील हदीसमध्ये जे दयेचे वर्णन केले आहे, तिचा संबंध फक्त 'मुस्लिमां'पुरताच नाही. तर सर्व मानवजातीसाठी आहे. सर्व धर्माच्या लोकांचा हक्क आहे की त्यांच्यावरही मुस्लिमांनी दया करावी. त्यांच्या गरजा भागवाव्यात व त्यांच्या उपयोगी पडावे.

दुसऱ्या हदीसमध्ये दयेची कक्षा अत्यंत विस्तृत केली आहे. वस्तुत: सर्व प्राणीमात्र दयेस पात्र आहेत.

## २१) ईश्वराच्या कार्यासाठी खर्च करणे

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"हे आदमच्या (ईश्वराने निर्माण केलेला पहिला मानव) पुत्रांनो! जी संपत्ती (गरजेपेक्षा जास्त) आहे, ती तुम्ही अल्लाहच्या कार्यात खर्च करा. तेच तुमच्यासाठीही योग्य आहे. तू ती संपत्ती साठवून तुझ्याजवळ ठेवलीस तर ते तुझ्यासाठी अत्यंत वाईट आहे. गरजेपुरते साठवणे योग्य आहे. जर तू संपत्ती खर्च करण्याचे ठरविलेस तर ज्यांचा तुझ्यावर अधिकार आहे त्यांच्यावर सर्वप्रथम खर्च कर." - मुस्लिम

या 'हदीस'वरून आपल्या लक्षात येईल की गरजेपेक्षा जास्त संपत्ती जमा करणे वाईट आहे. गरजेपेक्षा जास्त असलेली संपत्ती गरजू, गोरगरीब व अनाथासाठी खर्च करणेच योग्य आहे. गरजू नातेवाईकांवर खर्च केल्यानंतरच दुसऱ्यांना मदत करावी.

एका अन्य हदीसमध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"हे आदमच्या मुला, तू गरिबांसाठी खर्च कर मी तुझ्यासाठी खर्च करेन."

- बुखारी, मुस्लिम

एका अन्य 'हदीस' मध्ये माननीय अबू जर म्हणतात,

"मी अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांच्याजवळ गेलो, तेव्हा ते काबागृहाजवळ बसले होते. त्यांनी मला पाहून सांगितले,

"काबागृहाच्या ईश्वराशपथ, ते लोक अत्यंत नुकसान सोसतील."

अबू जर यांनी प्रेषित मुहम्मद (स.) यांना विचारले, "तुमच्यासाठी माझ्या माय-बापांचे बलिदान असो, ते कोणते लोक आहेत?"

प्रेषित मुहम्मद (स.) उद्गारले,

"ते लोक ज्यांच्याकडे विपुल संपत्ती आहे, पण ज्यांनी सभोवतालच्या (गोरगरिबां)वर खर्च केला, ते मात्र नुकसानीत असणार नाहीत. मात्र अशा लोकांची संख्या फार कमी असेल." - बुखारी, मुस्लिम

## २२) जुलूम आणि स्वार्थ

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जुलूम करू नका. कारण जुलूम करणारास शेवटच्या दिवशी (न्यायदानाच्या दिवशी) अंधारालाच सामोरे जावे लागेल. तुम्हास अंधाराच्या (नरकाच्या) रूपात जुलुमाचे फळ मिळेल. जुलुमाबरोबरच स्वार्थापासून लालचेपासून दूर राहा. कारण लालचेमुळे व जुलुमामुळे तुमच्यापूर्वी अनेकांची वाताहत झाली आहे. स्वार्थासाठी या माणसांनी भूतलावर रक्तपात केला. ज्या गोष्टी आम्ही नाकारल्या होत्या, निषिध्द ठरविल्या होत्या त्या गोष्टी त्यांनी 'वैध' स्वीकारणीय ठरविल्या." - मुस्लिम

या हदीसमध्ये जुलूम व अन्याय यापासून दूर राहण्यास सांगितले आहे. मानवाने केलेला जुलूम न्यायदानाच्या दिवशी त्यांच्यासमोर अंधार होऊन उभा ठाकणार आहे. आणि जुलूम करणारी व्यक्ती अंधारात भटकेल. म्हणजे त्या व्यक्तीस नरकवास भोगावा लागेल.

यानंतर लोभापासून दूर राहण्याची आज्ञा देण्यात आली आहे. लौकिक जग व धनदौलतीची हाव अगणित पापांचे मूळ आहे. त्यामुळे मानवास शेवटच्या दिवसाचा विसर पडतो. धर्मासाठी त्याग करण्यास तो कांकू करू लागतो. दुसऱ्याच्या हक्कावर गदा आणतो. प्रसंगी जुलूमही करतो. एवढेच नव्हे तर इतरांच्या इज्जतीवरही घाला घालतो. रक्तपातही करतो.

दुसऱ्या एका 'हदीस'मध्ये सांगितले गेले आहे,

"ज्यांनी आपल्या बांधवावर जुलूम केला आहे, त्याने स्वतःच्या पापक्षालनासाठी बंधुची माफी मागितली पाहिजे. जुलूम करणाऱ्याने लक्षात ठेवले पाहिजे की न्यायदानाच्या दिवसापूर्वी त्याच्याजवळ कसलीच संपत्ती असणार नाही. त्याने पुण्यकृत्य केले असल्यास केलेल्या पापकृत्याच्या प्रमाणात पुण्य घटेल. पुण्यकृत्य केले नसल्यास व ज्यांच्यावर जुलूम केला आहे, त्याचे गुन्हेही त्यांच्या नावावर टाकले जातील. परिणामी त्याला नरकाग्नीमध्ये टाकले जाईल." - बुखारी

## २३) घमेंड

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ज्या माणसाच्या मनात किंचितही घमेंड असेल, तो स्वर्गात प्रवेश करू शकणार नाही."

त्यावर एका गृहस्थाने विचारले,

"चांगले कपडे असावेत, पायात चांगले जोडे असावेत, अशी मानवाची इच्छा असते."

त्यावर प्रेषित म्हणाले,

“ईश्वर स्वत:ही स्वच्छतेचा व सौंदर्याचा उत्कृष्ट नमुना आहे. स्वच्छता व सौंदर्याची इच्छा वेगळी व घमेंड वेगळी, इतरजनांच्या हक्कांना दुय्यम समजून त्यांना खाली पाहावे लागेल, असे वर्तन अल्लाहच्या लेखी दु:साहस होय.” – मुस्लिम

स्वर्ग या गोष्टींचेच प्रतिफळ आहे की अल्लाह मानवांचा मालक, पालक व शासक असून फक्त तोच भक्तीस योग्य आहे, असे समजून स्वतः अनाथ व आधारहीन समजून ईश्वरासमोर नतमस्तक होईल. तसेच अल्लाहला 'दाता' समजून व त्याचे उपकार स्मरून आभार मानील. तो कधीही घमेंड करणार नाही. निरर्थक अभिमानही करणार नाही.

जो अल्लाहपेक्षा स्वत:ला श्रेष्ठ समजत असतो, अशा माणसामध्ये भक्ती व प्रार्थना यांचा मागमूस नसतो. अशी माणसे अश्रध्द असतात. ते आपली शक्ती, आपले सौंदर्य, आपली धनदौलत, आपले ज्ञान व अधिकार यामुळे घमेंडी होतात. ते स्वत:ला दुसऱ्यापेक्षा उच्च समजतात. इतरांना नीच (हलके) समजतात. या घमेंडीत लोकांना वाटत असते की, शक्ती, सौंदर्य वगैरे वस्तू त्यांच्या स्वत:च्या आहेत.

वरील सर्व वस्तू ईश्वराने निर्माण व प्रदान केलेल्या आहेत, हे त्यास समजले असते तर तो अल्लाहपुढे नतमस्तक झाला असता. वाईट वर्तणुकीपासून दूर राहिला असता आणि त्याच्या वाईट परिणतीची त्याला भीती वाटली असती.

## २४) उच्च-नीच (श्रेष्ठ-कनिष्ठ)

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

“जे लोक इस्लाम स्वीकारण्यापूर्वी अज्ञान अंधकारात भटकत असत, ते त्यांच्या अज्ञान काळातही 'चांगले' होते. त्यांनी इस्लाम स्वीकारल्यानंतरही ते चांगलेच आहेत. मात्र त्यांनी ज्ञान (इस्लामचे) आणि प्रज्ञा जोपासली पाहिजे.” – बुखारी, मुस्लिम

हा एका दीर्घ हदीसचा छोटासा भाग आहे. अल्लाहच्या प्रेषितांना विचारले गेले,

“सर्वात चांगले लोक कोण ?”

प्रेषितांनी उत्तर दिले,

“जे अल्लाहला भितात, त्यांना अल्लाह सर्वांत चांगले व उच्च दर्जाचे लोक समजतो.”

तेव्हा परत प्रेषितांना विचारले,

“आम्ही त्यांच्याबद्दल नाही विचारीत.”

त्यावर प्रेषित उत्तरले,

“सर्वश्रेष्ठ तर अल्लाहचे प्रेषित 'यूसुफ' हे आहेत. जे अल्लाहचे प्रेषित 'याकूब' यांचे पुत्र आहेत 'याकूब' हे अल्लाहचे प्रेषित 'इसहाक' यांचे पुत्र होते आणि इसहाक हे अल्लाहचे निकटवर्ती (प्रिय) 'प्रेषितां' चे पुत्र होते.

त्यावर प्रेषितांना पुन्हा विचारले गेले,

"आम्ही त्याबाबत विचारीत नाही."

त्यावर प्रेषित म्हणाले,

"तर तुम्ही अरबी कबिल्याबद्दल विचारीत आहात काय?"

लोक म्हणाले,

"हो, आम्ही अरबी कबिल्याबद्दलच विचारीत आहोत."

त्यावर प्रेषित म्हणाले,

"तुमच्यापैकी इस्लाम स्वीकारण्यापूर्वी अज्ञान काळात जे चांगले होते, ते इस्लाम स्वीकारल्यानंतरही चांगलेच आहेत. मात्र त्यांनी सद्धर्माचे (इस्लामचे) ज्ञान मिळविले पाहिजे."

- बुखारी, मुस्लिम

आतापर्यंत हे स्पष्ट झाले आहे की इस्लाममध्ये जात, रंग आणि धनदौलत यांच्या आधारावर उच्च-नीच मानले जात नाही. सर्व मानव आदम आणि हव्वा (आदमच्या पत्नी) यांची संतती आहे. सर्व मानव अल्लाहचेच दास आहेत. त्यामुळे सर्व सारखेच आहेत. जो अल्लाहची मनोभावे भक्ती करतो व त्याला भितो, तोच जास्त उच्च समजला जातो.

पवित्र कुरआनमध्ये लिहिले आहे.

"हे मानवांनो ! आम्ही (ईश्वराने) तुम्हास एकाच स्त्री-पुरुषापासून निर्माण केले आहे. वंश व कबिले निर्माण केले, जेणेकरून तुम्ही एकमेकांस ओळखावे. वस्तुतः अल्लाहला जो सर्वांत जास्त भितो, तोच सर्वांत उच्च-श्रेष्ठ आहे."

- सूरह अलहुजूरात - ४९:१३

दुसऱ्या एका 'हदीस'मध्ये अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"आपल्या वाडवडिलांवर गर्व करणे लोकांनी सोडावे. ते तर नरकाचे धनी झाले. तसे केल्यास अल्लाहच्या नजरेत, नरकातील किड्याप्रमाणे जे मलमूत्रात लोळत असतात. तुच्छ समजले जाल. अल्लाहचा इस्लाम स्वीकारण्यापूर्वी अंधकारयुगात वावरत पूर्वजांवर गर्व करण्याचे तुमचे दोष दूर केले आहेत. आता फक्त अल्लाहवर श्रध्दा ठेवणारे व दुर्दैवी अश्रध्द असे दोनच भेद मानवात आहेत. मात्र ती सर्व माणसे आदमचे वंशज आहेत ज्यांना मातीपासून तयार केले आहे."

- अबू दाऊद, तिर्मिजी

माननीय युसूफ यांना प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सर्वांत श्रेष्ठ सन्माननीय यासाठी मानले आहे की ते स्वत: प्रेषित होते. ते अल्लाहच्या धर्माचा प्रसार करण्यात आघाडीवर होते. त्यांचे वडील, आजोबा व पणजोबा सर्वजण अल्लाहचे नबी (प्रेषित) होते. जेव्हा प्रेषित मुहम्मद (स.) यांना अरबांच्या या पूर्वजांबद्दल कळाले, तेव्हा त्यांनी कोणा एका कबिल्यास चांगल्या वर्तनाचे म्हणण्याऐवजी, जे लोक अज्ञान आणि अडाणीपणाच्या काळात उच्च दर्जाचे नैतिक

आचरण करीत होते (मग ते कुठल्याही कबिल्याचे असोत) त्यांनी इस्लाम स्वीकारल्यानंतर ते चांगलेच व श्रेष्ठ ठरतील. इस्लाम स्वीकारल्यानंतर त्यांनी इस्लामचे आचरण केले पाहिजे. इस्लामचे आचरण हा धर्मपरायणतेचा पाया आहे.

## २५) राग

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"एखाद्यास कुस्तीत पराजित करणारा शक्तिशाली नसतो, तर शक्तिमान तो आहे जो राग आल्यावरही त्यावर नियंत्रण ठेवतो, संयम ठेवतो." - बुखारी, मुस्लिम

राग हा अनेक दोषांचा जनक आहे. रागामध्ये माणूस शुध्द-बुध्द हरवून बसतो. त्याला स्वत:च्या मुखावाटे वाईट शब्द बाहेर पडतात याचेही भान नसते. रागाच्या भरात तो काय करेल? याचेही त्यास भान राहत नाही.

तलाक, हत्या व घराणीच्या घराणी यांची बरबादी रागातच होत असते. कधीकधी मानव रागात असे वर्तन करतो की त्यामुळे अल्लाह त्याच्यावर नाराज होतो. रागामध्ये माणसाला आपल्या दुष्कृत्याचा परिणाम शेवटच्या दिवसावर (न्यायदानाच्या दिवसावर) काय होईल हेही लक्षात येत नाही. रागामध्ये माणूस स्वत:चे नष्टचर्य ओढवून घेतो.

एक गृहस्थ प्रेषितांना म्हणाले -

"मला उपदेश करा."

त्यावर प्रेषित उत्तरले -

"राग सोडून दे." - बुखारी

त्या गृहस्थाने वारंवार विनंती केली की "मला उपदेश करा". आणि प्रत्येकवेळी प्रेषितांनी हेच उत्तर दिले, "राग करु नका!"

'हदीस' मध्ये रागापासून दूर राहण्याचे अनेक उपाय सांगितले आहेत. जसे -

"मनात सैतान शिरल्यामुळे राग येतो. सैतानांची निर्मिती अग्निपासून झाली आहे. आग पाण्याने विझते. जेव्हा कधी राग येईल तेव्हा पाण्याने 'वजू' करावे. (म्हणजे थंड पाण्याचे मुखमार्जन (तोंड धुणे) करावे. थोडक्यात मुख, हात व पाय स्वच्छ करावेत.)" - अबू दाऊद

एका दुसऱ्या जागी सांगितले की -

"एखाद्याला कधी राग आला आणि तो उभा असला तर त्याने बसून जावे. बसलेला असेल तर आडवे अंग टाकणे (झोपणे)." - तिर्मिजी, अहमद

एका अन्य 'हदीस' मध्ये राग गिळण्याचे कौतुक खालील शब्दांत केले आहे,

"ईश्वराच्या भक्तांना राग गिळणे आवश्यक आहे. जर कोणी दास (ईश्वराचा) ईश्वराच्या प्रसन्नतेसाठी राग गिळीत असेल तर ते सर्वोत्तम." - अहमद

## २६) शरम आणि लाज

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"शरम बाळगण्यातच मानवाचे कल्याण आहे" - बुखारी, मुस्लिम

शर्म (शरम) म्हणजे वाईट गोष्टींचा तिरस्कार करणे. जो शर्म बाळगून वाईटाकडे वळत नाही, त्याचे कल्याणच होते. यात काही शंका नाही. जो माणूस जास्तीतजास्त शर्म बाळगून वागेल, तितका तो वाईट कामापासून दूर राहील. जो बेशरमपणे वागेल तो वाईट कामाच्या आहारी जाईल.

आजच्या समाजाचे पायाभूत 'गैरवर्तन' समाज बिघडविण्यास कारणीभूत होत आहे.

एका अन्य 'हदीस' मध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"माझ्या अगोदर अनेक प्रेषित होऊन गेले त्यांच्या नावावर आज जे मार्गदर्शन (शिक्षण) दिले जाते, ते बेशरमपणाचा कळस आहे. त्यामुळे मानव भरकटून वाटेल ते करेल." - बुखारी

## २७) सुहृदयता (मनाची कोमलता)

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ज्याला मनाची कोमलता नाही, त्याला चांगुलपणा मिळालाच नाही." - बुखारी

दुसऱ्या एका 'हदीस' मध्ये अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ईश्वर दयाळू आहे. तो सहृदयताच पसंद करतो. मनाच्या दयाळू व्यक्तिवरच तो प्रसन्न होतो. कठोर मनाच्या व्यक्तीवर नाही." - मुस्लिम

यावरून आपल्या लक्षात येईल की मुस्लिमाने सर्वांशी दयाळूपणानेच वर्तन करावे. क्वचितप्रसंगी त्याला कठोर व्हावे लागले तर अपवाद.

## २८) जीभ व जननेंद्रियांचा संयम

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जो माणूस तोंडातील जीभ व दोन्ही पायांमधील इंद्रिय (जननेंद्रिय) या वर नियंत्रण ठेवतो व त्यांच्यावरील संयमाची खात्री देतो, त्यास मी स्वर्गाची हमी देतो."

- बुखारी, मुस्लिम

जी व्यक्ती तोंडातील जीभ व जननेंद्रिय यांच्यावर नियंत्रण ठेवते, वर्तनाद्वारे अल्लाहला प्रसन्न ठेवते, वर्तनात संयम ठेवते, अयोग्य वर्तन करीत नाही. त्या व्यक्तीस निश्चितपणे स्वर्गात प्रवेश मिळतो. जिभेच्या बाबतीत प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ईश्वराचा दास मानव, अल्लाह आनंदित होईल असे वर्तन कधी करतो. त्या बाबतीत कसलाही गर्व करीत नाही. (सद्वर्तन करून त्याचे प्रसिद्धीसाठी भांडवल करीत नाही.) परंतु होते ते असे की अल्लाह त्याच्या या वर्तनावर खूश होतो. त्याला चांगला (मानव समजून) उच्च दर्जा देतो. (म्हणजे त्याला स्वर्गास पात्र ठरवितो.)

आणि कधी कधी असेही घडते की (त्याच्या नकळत), (अल्लाह नाराज होईल असे कृत्य त्याच्याकडून घडते.) त्याची त्याला जाणीवही नसते. अथवा ती व्यक्ती त्यास महत्त्वही देत नाही. (मात्र अल्लाह सर्वत्र आहे.) अयोग्य वर्तनामुळे ती व्यक्ती खड्ड्यात पडते. तिला नरकवास भोगावा लागतो." - बुखारी

व्याभिचार (अनैतिक परस्त्रीगमन) व अयोग्य वर्तनाचा तपशील देताना प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"वाईट नजरेने पाहणे हा डोळ्यांचा व्याभिचार होईल. कानाने (वाईट) ऐकणे हा कानाचा व्याभिचार होईल. हाताने वा पायाने अयोग्य काम करणे हेही गैरवर्तनच होईल. होते असे की विषयवासना (वाईट इच्छा) निर्माण होते. मन वाईट इच्छा स्वीकार करू इच्छिते तेव्हा जननेंद्रिय त्या वासना वाईटच होत्या किंवा नाही हे सिद्ध करते."

- बुखारी, मुस्लिम

व्याभिचार आणि अश्लील वर्तनापासून स्वत:स वाचवावयाचे असल्यास स्वत:च्या सर्व अवयवावर व वासनांवर संयम बाळगून विजय मिळविणे आवश्यक आहे.

## २९) शिवीगाळ करणे

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"कोणाही मुस्लिम व्यक्तीस शिवीगाळ करणे ही अल्लाहची अवज्ञा आहे. मुस्लिमाबरोबर लढणे अधर्म आहे." - बुखारी, मुस्लिम

श्रद्धावानांबरोबर लढणे हे अधर्मी व्यक्तीचे काम आहे. धार्मिक व्यक्ती असे कधीही करणार नाही. मुस्लिमांबरोबर लढणे तर दूरच त्यांना शिविगाळ करणे, त्यांच्याबरोबर भांडणे अयोग्य आहे. पण दु:खाची गोष्ट अशी की श्रद्धावानांना शिवीगाळ करणे व त्यांच्याबरोबर भांडणे आज सर्वत्र दिसून येते. त्यात काही वाईट आहे, असे त्यांना वाटत नाही.

एका अन्य 'हदीस' मध्ये सांगितले आहे,

"लज्जा बाळगणे व शांत राहणे हेही धार्मिकतेचे लक्षण आहे. बेशरमपणा, शिवीगाळ करणे व निरर्थक बडबड करणे हे दांभिकांचे लक्षण आहे."

- तिर्मिजी, अहमद व हाकिम

वरील 'हदीस'मध्ये केवळ मुस्लिमांस शिवीगाळ करणे वाईट आहे, असे म्हटलेले नाही, तर एकूण मानवजातीस शिवीगाळ करणे वाईट आहे, असे म्हटले आहे.

दुसऱ्या एका हदीसमध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"आपल्या आईवडिलांना शिवीगाळ करणे हे महतपाप आहे. एकदा सहाबांनी (प्रेषितांच्या बैठकीतील निकटवर्ती तज्ञ मुस्लिम) प्रेषितांना विनंती केली,

"खरच कुणी आपल्या आईवडिलांना शिवीगाळ करेल?"

त्यावर प्रेषित (स.) उतरले,

"जर कोणी दुसऱ्या माणसांच्या आई-वडिलांना शिवीगाळ करतो व तो दुसरा माणूस पहिल्या माणसाच्या आईवडिलास शिवीगाळ करतो. (तेव्हा ते एकमेकांच्या आई-वडिलास शिवीगाळ करतात.)" - बुखारी, मुस्लिम

दुःखाची गोष्ट अशी की, आज माणसे स्वतःच आपल्या आईवडिलास शिवीगाळ करतात. तसेच दुसऱ्याकडूनसुध्दा स्वतःच्या आईवडिलास शिवीगाळ करवितात.

एका अन्य 'हदीस'मध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ज्यांचा मृत्यू झाला आहे, त्यांच्याबद्दल वाईट बोलू नका. कारण (आखिरतच्या दिवशी / न्यायदानाच्या दिवशी) त्यांच्या कृत्याचे ते फळ भोगणार आहेत." - बुखारी

## ३०) निंदा - नालस्ती, खोटे आरोप व चहाडी

एका सहाबींना प्रेषितांनी विचारले,

"एखाद्या व्यक्तीने तिच्या माघारी निंदानालस्ती करणे म्हणजे काय?"

दुसरे सहाबी म्हणाले,

"या बाबतीत अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांना जास्त माहिती आहे."

त्यावर प्रेषित म्हणाले,

"तुम्ही तुमच्या भावामध्ये, त्याला पसंत नसलेल्या किंवा त्याच्या वर्तनात नसलेल्या बाबींचा उल्लेख करून, त्याला दोषारोप करणे."

त्यावर पुन्हा सहाबींनी विचारले,

"माझ्या धर्मबंधुत नसलेल्या गुणाबद्दल त्याला कसे ताडण करता येईल?"

त्यावर प्रेषित म्हणाले,

"तुम्ही तुमच्या बंधुत असलेल्या गुणाबद्दल ताडण केले, तर ती निंदा-नालस्ती

होईल. जर त्याच्यामध्ये नसलेल्या दोषाबद्दल त्याला ताडले, दोष दिला, तर तो खोटा आरोप होईल.'' - मुस्लिम

पवित्र कुरआनमध्ये सांगितले आहे,

''तुमच्यापैकी कोणीही दुसऱ्याच्या पाठीमागे, निंदा-नालस्ती करू नये. तुमच्यापैकी कोणीही मेलेल्या बंधुचे मांस खाईल का? तुम्हाला त्याची घृणा वाटेल.''

- सूरह अलूहुजूरात ४९:१२

कोणाच्या गैरहजेरीत त्याच्या बाबतीत वाईट बोलले तर त्यास 'निंदा-नालस्ती' म्हणतात. ज्याच्याबद्दल वाईट बोलले गेले आणि त्याच्यात तो गुण नसेल तर 'खोटा आरोप' म्हटले जाते. खोटा आरोप करणे हे निंदा-नालस्तीपेक्षा मोठे पाप आहे. कधीकधी एखाद्याच्या पाठीमागे त्याची निंदा करणे हे 'चहाडी' लावण्यासारखे आहे.

निंदा-नालस्ती करणे, खोटे आरोप करणे व चहाडी करणे, मानवाने नरकाकडे जाण्यासारखे आहे. त्याचबरोबर समाजही त्याच्यापासून दूर जातो. म्हणून अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

''चहाडी करणारा स्वर्गात प्रवेश करू शकणार नाही.'' - बुखारी, मुस्लिम

## ३१) धीर (संयम) आणि आभार

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

''श्रध्दावंताची गोष्टच निराळी असते. श्रद्धावंताचे वर्तन व त्याची कसोटी ही त्याच्या कल्याणासाठीच असते. जेव्हा श्रध्दावंतांना चांगले अनुभव येतात, तेव्हा तो अल्लाहची कृतज्ञता व्यक्त करतो. कारण त्यात त्याचे कल्याण असते. जेव्हा त्याला त्रास होतो, वाईट अनुभव येतो, तेव्हा तो अल्लाहविषयी नाराज न होता, संयम बाळगतो. त्यातही त्याचे कल्याणच असते.'' - बुखारी, मुस्लिम

कृतज्ञतेचा अर्थ असा की श्रद्धावंताने अल्लाहची आठवण ठेवावी. प्रत्येक कल्याणास्पद घटनेनंतर त्याने अल्लाहचे आभार मानावेत. तोंडाने तर त्याने आभार मानावेतच, पण अल्लाहने त्याच्यासाठी ज्या वस्तू निर्माण केल्या आहेत, त्यांचा उपभोग घेतानाही अल्लाहचे आभार मानावेत. अल्लाह खूश होईल असे पाहावे. त्याचा कधीही विसर पडू देऊ नये. त्याची सर्वांत महत्त्वाची देणगी त्याचा धर्म आहे. तो धर्म कल्याणास्पद आहे यात शंका नाही. धर्माचे आदेश आम्ही मन:पूर्वक पाळावेत. अल्लाहच्या धर्माचे आदेश पाळणे हेही आभारप्रदर्शनच होईल. तीच शेवटच्या दिवसाच्या यशाची गुरुकिल्ली आहे. यात काही संशय नाही.

'धीर धरणे' हा सर्वांत मोठा सद्गुण आहे. आम्हास कितीही महत्त्वाची वस्तू प्राप्त झाली आणि ती आमच्या हातून निसटली. त्या वस्तूस आम्ही पारखे झालो, तरी मानवाने धीर धरावा. संयम बाळगावा. त्यासाठी रडणे-भेकणे करू नये. अल्लाहला 'असेच होणे अपेक्षित होते,' असे समजावे. ज्याचे होते त्याने नेले, हेही लक्षात घेणे आवश्यक आहे. अल्लाहची कोणतीही कृती निरर्थक नसते. आम्ही धीर बाळगला तर अल्लाह आमच्यावर खूश होईल व शेवटच्या दिवशी त्याची आमच्यावर कृपा होईल.

मानवाने कोणत्याही परिस्थितीत अल्लाहचा धर्म सोडता कामा नये. आमच्यावर येणारी संकटे धर्माच्या, अल्लाहच्या मार्गासाठी येत असतील, तर त्याने आनंदच मानला पाहिजे. पवित्र कुरआनने सांगितले आहे की, धीर धरण्याने, संयम केल्याने अल्लाह मदत करतो. त्याचबरोबर अंतिम निवाड्याच्या दिवशी अल्लाहच्या प्रसन्नतेचा अनुभव येतो. फलतः स्वर्गप्रवेश होतो.

## ३२) ईश्वराशी एकनिष्ठता

सुफियान बिन अब्दुल्ला सकफी एकदा म्हणाले की मी एकदा प्रेषितांना विचारले,

"हे अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.)! इस्लामबद्दल मला अत्यंत महत्त्वाची गोष्ट सांगा, जेणेकरून कुणाला त्याविषयी विचारण्याची गरज राहणार नाही."

प्रिय प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"सांगा, मी ईश्वराला अंतःकरणपूर्वक मानले आणि मग यावरच दृढ राहा."

- मुस्लिम

सुफियानने विचारलेला प्रश्न इस्लामचा आत्मा होता. थोडक्यात, इस्लामचे सार काय असा या प्रश्नाचा अर्थ होता. इस्लामचा आत्मा प्रेषितांकडून समजावून घेतल्यानंतर इतर कोणाचीही मदत न घेता उत्तर देता यावे, अशी सुफियानची इच्छा होती.

त्यावर प्रेषितांनी उत्तर दिले,

"तुम्ही अल्लाहशी आमरण एकनिष्ठ राहावे. फक्त त्याचीच भक्ती करावी. त्याचा दास होऊन, त्याने सांगितलेल्या कर्तव्यांपासून दूर जाऊ नये. ती मनःपूर्वक पार पाडावीत."

खरे पाहिले तर रस्ता एकच आहे. तो म्हणजे, कितीही संकटे आली तरी जीवनाच्या अंतापर्यंत ईश्वराशी एकनिष्ठ राहावे. मानवाला हा 'सत्य' मार्ग मिळाला नाही किंवा त्याने तो स्वीकारला नाही, तर त्याचे जीवन अयशस्वी व निरर्थक समजावे.

त्याचप्रमाणे एखाद्याने अल्लाहचा मार्ग स्वीकारला व त्याने पुन्हा तो मार्ग सोडला तर त्याचे जीवनही अयशस्वी समजावे.

पवित्र कुरआनात व अनेक हदीसमध्ये म्हटले आहे,

"या जगातील व मरणोत्तर जीवनाचे यश संयम व ईश्वरनिष्ठेवर अवलंबून आहे." संयम याचा अर्थ असा की, मुस्लिमाने संकटे आणि त्रास यांचा शौर्याने मुकाबला करावा. संकटांनी न डगमगता अल्लाहचा सत्य मार्ग सोडू नये. याकामी त्याचा प्राण गेला, तरी बेहत्तर! पण त्याने ईश्वरनिष्ठेपासून ढळू नये. त्याच्या (भक्ताच्या) कुटुंबाची वाताहत झाली, तरी त्याची पर्वा करू नये.

सत्यावर न ढळता कायम राहावे. एकदा सत्याचा स्वीकार केल्यानंतर जीवनाच्या अंतापर्यंत धैर्याने एकनिष्ठ राहावे. एकाच ईश्वराची अल्लाहची आराधना करावी. ईश्वराने दाखविलेल्या मार्गावर आपल्या सर्व सामर्थ्याने (बौध्दिक, मानसिक व आर्थिक) चालत राहावे.

वस्तुत: धैर्याविना व संघटनेविना लौकिक व पारलौकिक यश प्राप्त होत नाही.

## ३३) विहित, अविहित व संदिग्ध

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"असाही काळ येईल, मनुष्य त्याला मिळालेली वस्तू विहित मार्गाने की निषिध्द मार्गाने मिळाली आहे, याची पर्वा करणार नाही." - बुखारी

याचा अर्थ असा की माणूस योग्य-अयोग्य विहित-अविहित याचा विचार न करता अयोग्य मार्गाने सुख मिळवून जगू लागेल. चांगले (वैध) व अवैद्य यामध्ये फरक न करता दु:ष्कृत्याचा स्वीकार करून अयोग्य पध्दतीने जीवन जगेल.

दुसऱ्या एका 'हदीस'मध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"विहित व निषिध्द दोन्ही आपापल्या ठिकाणी स्पष्ट आहेत. मात्र या दोहोंच्यामध्ये काही संदेहास्पद गोष्टी असू असतात. याचा अर्थ असा की पूर्णत: स्वीकारणीय व पूर्णत: अस्वीकारणीय बाबी आपणास कळतात. तरीही माणसाची बुध्दी, सर्वच बाबतीत योग्य आहेत की अयोग्य आहेत याबाबत संदेहात पडते. त्यांच्या योग्यते-अयोग्यतेबाबत मानवी बुद्धी निर्णय घेऊ शकत नाही. जो माणूस अशा संदेहास्पद बाबींपासून दूर राहील, त्याचा धर्म व इज्जत शाबूत राहतील. जे संदेहास्पद वस्तूंचा स्वीकार करतील, त्यांचा धर्म नष्ट होईल.

वर्जित व अवर्जित यामध्ये अत्यंत सूक्ष्म अंतर असते. समजा, शेजारी-शेजारी दोन कुरणे आहेत. जेथे पशु चरण्यासाठी आणतात. त्यापैकी एक कुरण वर्जित आहे. तेथे जनावरे चारणे अयोग्य आहे. त्या कुरणांपैकी अवर्जित कुरणामध्ये जनावरे चारता-चारता वर्जित कुरणामध्ये जनावरे चारण्याची बुद्धी होते, तेथे तो गुराखी संदेहात पडतो. आपली गुरे

वर्जित कुरणामध्ये चारणे योग्य होईल का? नेमके अल्लाहने वर्जित व अवर्जित हे ठरवून दिले आहे. मात्र जेथे 'संदेह' असेल ती वस्तू स्वीकारावी की नाही? असा आमच्यापुढे जेव्हा प्रश्न उपस्थित होईल, तेव्हा संदेहास्पद वर्तन न करणेच केव्हाही योग्य होईल. तशी संदेहास्पद बाब स्वीकारू नये.

आमच्या शरिरात 'हृदय नावाचा मांसाचा एक तुकडा आहे. तो निरोगी राहिला तर शरीर निरोगी राहील.''

- मुस्लिम, बुखारी

वरील 'हदीस' अत्यंत महत्त्वाची आहे. मुस्लिमांचे कर्तव्य आहे की त्यांनी वर्जित व संदेहास्पद बाबींपासून वर्तनापासून दूर राहिले पाहिजे. हेही लक्षात घेतले पाहिजे की वर्तन हे आपल्या मनावर अवलंबून असते.

मनात अल्लाहची भीती, त्याचे प्रेम व भावविवशता असेल, तरच मनुष्य सज्जन बनेल.

## ३४) धर्माचे आवाहन

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

''जो मनुष्य सद्धर्माकडे एखाद्यास बोलावील व त्याच्या आवाहनास साद देऊन काही सद्धर्माकडे येतील व सद्वर्तन करतील, तर त्यांचे सर्व पुण्य सद्धर्माकडे बोलावणाऱ्यास मिळेल. याचप्रमाणे एखाद्याने एखाद्यास दुर्वतनाकडे येण्याचे आवाहन केले आणि त्याप्रमाणे माणसे दुर्वतन करू लागली, तर त्यांचे सर्व पाप दुर्वतनाकडे बोलावणाऱ्याच्या माथी पडेल. त्याच्या गुन्ह्यांपैकी काडीमात्रही गुन्हा कमी होणार नाही.''

- मुस्लिम

जगात दोन प्रकारची माणसे दिसून येतात. काहीजण लोकांना सद्वर्तनाकडे बोलावतात तर काही जण दुर्वतनाकडे.

'सद्वर्तनी माणसे अल्लाहला पसंद असतात.'

'दुर्वतनी माणसांना तो नापसंद करतो.'

जी माणसे स्वत:चे विचार दुसऱ्यावर लादून, त्यांच्या वंशाचे परंपरागत विचार, दुर्वतन, कामवासना आणि लौकिक जीवनाकडे येण्याचे आवाहन करतील ते अल्लाहचे गुन्हेगार ठरतील. त्यांच्या पापाचे ओझे आवाहन करणाराच्या माथी मारले जाईल. आवाहनाप्रमाणे जे लोक दुर्वतन करतील त्यांना व त्यांच्याबरोबर आवाहन करणाऱ्यास शिक्षा केली जाईल. त्याला नरकामध्ये पाठविले जाईल.

याउलट जो माणूस अल्लाहची भक्ती व दासता करील, सद्धर्माप्रमाणे आचार व प्रचार करील, नैतिकतेचे आवाहन करील,त्याला स्वर्गाचे बक्षीस मिळेलच. आवाहनाप्रमाणे जे

लोक आचरण करतील त्यांनाही स्वर्ग मिळेल. जर एखाद्या माणसाने धर्माबाबत उदासीन असणाऱ्या तथा पाखंडी माणसांना सद्धर्माचे आवाहन केले व ते पाखंडी सद्धर्मास अनुसरले तर त्या पाखंडी माणसाला मिळणाऱ्या पुण्याईचा वाटा आवाहन करणाऱ्यास मिळेल.

किती पवित्र आहे सद्वर्तन आणि सद्धर्म! तसेच त्याचे आवाहन करणारा सच्छिल मानव !

## ३५) सद्वर्तनास प्रोत्साहन व दुर्वर्तनाचे हनन

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"तुमच्यापैकी कोणी एखाद्या व्यक्तीस दुर्वतन करताना पाहिले तर सर्व शक्तिनिशी तिचा प्रतिकार करावा. शक्तिनिशी प्रतिकार करणे शक्य नसेल तर तोंडी बोलून दुर्वतनाचा प्रतिकार करावा, त्यास रोखावे. तेही शक्य नसल्यास मनोमन प्रतिकार करावा. मात्र तो निष्ठेचा अत्यंत कमकुवत मामुली प्रकार असेल." - मुस्लिम

एका अन्य हदीसमध्ये प्रेषितांनी सांगितले.

"माझ्या अगोदर अल्लाहकडून जे प्रेषित आले त्यांना त्यांच्या अनुयायांनी प्राणपणास लावून सहकार्य केले. त्यांच्या उपदेशाचा दोर हाती घट्ट धरून त्यांच्या आज्ञेचे पालन केले. त्यानंतर काही मूर्ख व पाखंडी माणसे जन्मली. त्यांनी ईश्वराची आज्ञा पाळीत असल्याचा दावा केला. मात्र सद्धर्माचे पालन न करता तो पालन करीत असल्याचे सोंग केले. अशा पाखंडी माणसाविरुद्ध प्राणपणाने लढेल, तोच मोमीन (सच्चा मुस्लिम) ठरेल. अशा पाखंडी माणसाविरुद्ध उभा ठाकून तशारीरिक शक्ती व वाचा शक्तीने प्रतिकार करील. त्यासच सच्चा मुस्लिम हे नामाभिधान सार्थ ठरेल. असे न होईल तर त्या व्यक्तीस कणभरही मुस्लिम मानले जाणार नाही." - मुस्लिम

यावरून आपल्या लक्षात येईल की, दुर्वतनाचा प्रतिकार व नैतिकतेचा स्वीकार हेच मुस्लिम धर्मनिष्ठेचे प्रतीक आहे.

## ३६) शिस्त व आज्ञापालन

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"मुस्लिमांनी आज्ञा ऐकावी व तिचे अनुपालन करावे. यात त्याच्या व्यक्तिगत पसंदी-नापसंदीचा प्रश्नच उद्भवत नाही. जोपर्यंत त्याला चुकीची आज्ञा केली जात नाही, तोपर्यंत आज्ञापालन आवश्यक आहे. मात्र चुकीची आज्ञा केल्यास ती पाळण्याचा प्रश्नच उद्भवत नाही." -बुखारी, मुस्लिम

आपल्या लक्षात येईल की सच्चा मुस्लिमाने संघटित व आज्ञाकारी असावे. त्यांचा एक अध्यक्ष-प्रमुख असावा. त्याच्या हाताखाली अनेक अधिकारी असावेत. त्या

अधिकाऱ्याची आज्ञा सर्वांना पाळावी लागेल. मग ती आज्ञा पसंद असो अथवा नसो. मात्र या आज्ञा धार्मिक मर्यादेतच असाव्यात.

मात्र प्रमुखाने वा त्याच्या अधिकाऱ्याने अयोग्य हुकूम दिल्यास, तो पाळण्याचा प्रश्नच उद्‌भवत नाही.

दुसऱ्या एका 'हदीस' मध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"वाईट आज्ञा कधीही मान्य करू नये. आज्ञापालन फक्त कल्याणकारी आज्ञेचेच असावे."

- बुखारी, मुस्लिम

एका अन्य 'हदीस' मध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ज्यांनी माझी आज्ञा पाळली आहे, त्याने अल्लाहची आज्ञा पाळली. ज्याने माझी आज्ञा पाळली नाही, त्याने अल्लाहची अवज्ञा केली आहे."

"ज्याने प्रमुखाची आज्ञा पाळली त्याने माझी आज्ञा पाळली, ज्याने प्रमुखाची आज्ञा पाळली नाही त्याने माझी आज्ञा पाळली नाही."

"प्रमुख ही ढाल आहे. त्याच्या आश्रयाने लढाई लढली जाते. भांडण-तंटे आणि हल्ल्यापासून त्याच्यामुळे बचाव करता येतो."

"प्रमुखाने न्यायपूर्वक व ईश्वर निष्ठेने आदेश दिले तर त्यास पुण्य (स्वर्ग) प्राप्त होईल. जर त्याने धर्मबाह्य आदेश दिले तर त्याचे फळ-नरक त्यास प्राप्त होईल."

- बुखारी, मुस्लिम

यावरून आपल्या लक्षात येईल की धर्मपालन, संघटन, शिस्त व आज्ञापालन यांचे इस्लाममध्ये जास्त महत्त्व आहे.

## ३७) ईश्वराचे स्मरण व आशीर्वाद

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जो ईश्वरचरणी लीन आहे व ज्याने ईश्वराकडे पाठ फिरवली, त्यांची तुलना (अनुक्रमे) जिवंत व मृत माणसासारखी आहे." - मुस्लिम, बुखारी

मानवाचे जीवन, धार्मिक, नैतिक व मानसिक बाबतीत अल्लाहची दासता आणि सद्‌धर्माचा प्रसार व प्रचार यावर अवलंबून आहे. मानवाचे ईश्वराशी प्रामाणिक संबंध आहेत. यावरून त्याची सत्यता कळून येते.

ईश्वरसंबंधांची सत्यता मानव ईश्वराची आठवण किती करतो, यावर तपासून पाहता येते. ईश्वराची आठवण कुरआनपठण, नमाज, प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या वचनाप्रमाणे (हदीस) वर्तन व ईश्वरचरणी लीनता - दुआ (आशीर्वाद) मागणे या स्वरुपातील असेल.

एका अन्य 'हदीस' मध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"मी माझा दास जो मानव, त्याच्या विचाराप्रमाणे मी त्याच्याशी वर्तन करतो. जेव्हा तो माझी आठवण करतो, तेव्हा मी त्याचा पाठिराखा असतो. जेव्हा मानव अंत:करणपूर्वक माझे स्मरण करतो तेव्हा मीसुद्धा माझ्या मनात स्मरण करतो. जेव्हा मानव माझी सार्वजनिक कार्यक्रमात (नमाज, धार्मिक मेळावे वगैरे) आठवण करतो, तेव्हा मी त्याच्या 'संगती'पेक्षा चांगल्या 'संगती'मध्ये (देवदूतांच्या) बरोबर त्याचीही आठवण करतो." - बुखारी, मुस्लिम

एका 'हदीस' मध्ये प्रेषितांनी सांगितले,

"याचना मागणे ही भक्तीच होय."

वरील 'हदीस' नंतर प्रेषितांनी कुरआनाची पुढील आयत (श्लोक) म्हटले,

आणि तुमच्या ईश्वराने म्हटले,

"माझ्याजवळ प्रार्थना/याचना करा. मी ती पूर्ण करेन. जे माझ्या भक्तीशिवाय वरचढ होण्याचा प्रयत्न करतील ते नरकाचे भागी होतील. (थोडक्यात त्यांना नरकवास भोगावा लागेल.) त्यांची अब्रू धुळीस मिळेल." - तिर्मिजी, अबू दाऊद, नसई व इब्ने माजा

## ३८) पश्चात्ताप आणि क्षमेची याचना

"हे मानवांनो! ईश्वरासमोर क्षमायाचना करा. मी शेकडो वेळा अल्लाहची माफी मागतो." - मुस्लिम

प्रेषित मुहम्मद (स.) निर्दोष आणि सत्‌चरित्राचे आदर्श होते. तरीही ते दिवसातून शेकडो वेळा 'तौबा' (पश्चात्ताप व्यक्त करणे) करीत असत. यावरून आपल्या लक्षात येईल की आमच्यासारख्या 'सामान्य' माणसांना ईश्वरचरणी पश्चात्ताप करण्याची किती नितांत गरज आहे.

वस्तुत: मानवाने स्वत:ला सुधारण्यासाठी, आत्मपरीक्षण करून ईश्वरासमोर चुकांची माफी मागणे आवश्यक आहे. तसेच पुढे चुका होणार नाहीत अशी प्रतिज्ञाही करणे जरूरी आहे. हाच खरा पश्चात्ताप आहे.

आणखी एका 'हदीस' मध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"जेव्हा मुस्लिम एखादा गुन्हा करतो, तेव्हा त्याच्या मनावर एक काळा डाग पडतो. मात्र त्याने केलेल्या गुन्ह्याबद्दल ईश्वराकडे माफी मागितली, तर तो डाग नष्ट होतो. जर पुन्हा त्याने गुन्हा केला तर तो काळा डाग वाढत जातो. तो सर्व मन व्यापून टाकतो. (त्यानंतर त्याचे काळीज सुधारणे अशक्यच असते.) हाच काळा गंज (पाण्याच्या संसर्गाने लोखंडावर तांबूसपणा चढतो तो) ज्याचा उल्लेख कुरआनमध्ये आलेला आहे, तो गुन्हेगारांच्या काळजावर चढतो. त्याचे काळीज व्यापून टाकतो."

- तिर्मिजी, इब्नेमाजा व अहमद

एका अन्य 'हदीस' मध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"अल्लाह दिवस-रात्र हात पसरून गुन्हेगारांना भेटण्यास तयार असतो. कारण रात्री ज्याने पाप केले, त्याला दिवसा पश्चात्ताप करता यावा. ज्याने दिवसा पाप केले, त्याला रात्री पश्चाताप करता यावा. याचा अर्थ असा की पश्चात्ताप व्यक्त करणाऱ्याच व्यक्तीचा स्वीकार करण्यास तो सदासर्वकाळ तत्पर असतो.

पश्चात्ताप व्यक्त करणाऱ्यांचा स्वीकार करण्याची क्रिया शेवटचा सूर्य मावळेपर्यंत म्हणजे जगबुडी येण्याच्या दिवसापर्यंत चालणार आहे. त्याचबरोबर न्यायाचा दिवस उजाडणार आहे."

- भावानुवाद, मुस्लिम

## ३९) जग आणि मरणोत्तर जीवन

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"या जगात असे समजून राहा की तुम्ही परदेशी आहात आणि प्रवाशाप्रमाणे हे जग केव्हाही सोडणार आहात."

- बुखारी

हे जग मानवाचे मूळ वसतिस्थान नाही. हा जग त्याला 'परदेशा' प्रमाणे आहे. येथील सर्व काही सोडून आपल्या मूळ वसतिस्थानाकडे परतावयाचे आहे. तेथेच कायम मुक्काम करावा लागणार आहे."

मानवाने या जगात जी पुण्यकृत्ये केली, त्याचे फळ म्हणून, त्याला कधीही न संपणारे स्वर्गाचे सदाआनंदी जीवन प्राप्त होईल. त्याने या जगात जी पुण्यकृत्ये केली, त्या प्रमाणात त्याला स्वर्गात सुखाची साधने प्राप्त होतील. तेथे त्याला दुर्लभ सुखाची प्राप्ती होईल, ज्याची त्याने स्वप्नातही कल्पना केली नसेल. अशा पवित्र माणसाला तेथे अल्लाहचे प्रेम, सान्निध्य व शाश्वत (कायम कधीही न संपणारे) सुख मिळेल.

मात्र मानवाजवळ पुण्याईचा साठा नसेल तर, तो अल्लाहच्या शापास बळी पडेल. त्याला नरकयातनांना सामोरे जावे लागेल.

इतके ज्ञान झाल्यावर आपल्या हे सहजच लक्षात येईल की सच्चा मुस्लिमाने या नश्वर जगाऐवजी शेवटच्या दिवसाची काळजी घेतली पाहिजे. या जगातील लौकिक यशापेक्षा पारलौकिक जगाच्या यशस्वी प्राप्तीसाठी सजग राहून पुण्याईचा साठा केला पाहिजे. शेवटच्या दिवशी हेच पुण्य उपयोगी पडेल. नरकापासून दूर राहण्यासाठी व स्वर्गेच्छेसाठी ईश्वरचरणी नम्र राहिले पाहिजे.

या नश्वर (नष्ट होणाऱ्या) जगाचा आणि आमचा संबंध फक्त स्वर्गाकडे नेणारा मदतनीस एवढाच राहावा. लौकिक जगातील स्वार्थामुळे आमच्या स्वर्गप्रवेशास अडथळा येऊ नये.

अन्य एका 'हदीस' मध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"स्वर्गातील एका चाबकाएवढीही जागा या लौकिक जगात जे सर्वोत्तम आहे, त्यापेक्षा अनंत पटीने मूल्यवान आहे." - बुखारी, मुस्लिम

स्वर्गातील तीळमात्र जागा व तेथील सुखसोई लौकिक जगातील सर्व सुखापेक्षा श्रेष्ठ आहे. म्हणून मानवाने लौकिक सुखापेक्षा पारलौकिक सुखाची अपेक्षा करणे केव्हाही श्रेष्ठच!

## ४०) सत्य संकल्प

अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"चांगल्या वर्तनाचा पाया हेतूवर आधारित असतो. ज्याने सत्य संकल्प करून त्याप्रमाणे वर्तन केले, मानवाचे वर्तन अल्लाह व प्रेषितांना प्रसन्न करून घेण्यासाठीच असेल तर त्याचे कल्याणच होईल. त्याला ईश्वरप्राप्ती होईल.

मात्र त्याची सर्व धडपड एखाद्या लौकिक फायद्यासाठी वा एखादी स्त्री प्राप्त करून घेण्यासाठी असेल तर फक्त तीच त्याला प्राप्त होईल.

परंतु तो स्वर्ग सुखास मुकेल." - बुखारी, मुस्लिम

जो माणूस अल्लाहची प्रसन्नता प्राप्त करून घेण्याच्या भावनेने काम करील, सत्कर्मे करील, त्याच्याच कर्मांना ईश्वर मान्यता देऊन त्याच्यावर खूश होईल. मात्र ती सर्व कर्मे अल्लाहचे प्रेषित मुहम्मद (स.) यांच्या निर्देशाप्रमाणे असली पाहिजेत.

एखादे कितीही मोठे सत्कर्म तुम्ही केले असेल आणि ते कीर्ती व देखाव्यासाठी असेल तर ते सत्कर्म अल्लाह कधीही कबूल करणार नाही. उलट ते कर्म कीर्तीलोलुप माणसाच्या तोंडावर फेकून मारले जाईल.

एका अन्य 'हदीस' मध्ये प्रेषित मुहम्मद (स.) यांनी सांगितले,

"ज्या कामात भक्ताने अन्य देवदेवतांना सामील करून घेतले आहे, ते कितीही चांगले असले तरी मी पर्वा करणार नाही. एखादा भक्त माझ्या मार्गदर्शनाप्रमाणे वर्तन करील आणि पूजनात अन्य देवदेवतांना सामील करून घेईल, तर मी त्याचा स्वीकार करणार नाही." - मुस्लिम

प्रेषितांच्या मार्गदर्शनाप्रमाणे सत्कर्मे केली आणि वर अन्य देवतांना खूश करण्याचा प्रयत्न केल्यास, मला तो मान्य होणार नाही.

* समाप्त *